**साहसी क्रीडा प्रकारातील गिर्यारोहण, माऊंटनिअरिंग, स्किईंग, स्नोबोर्डीग, पॅरासेलींग, हवाई क्रीडा स्पर्धा (हॅंग्लायडींग, पॅराग्लायडींग), जलक्रीडा आयोजित करणाऱ्या संस्थांसाठी सुधारित नियम व मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र २०१४/प्र.क्र.१०५/क्रीयुसे-१**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २६ जुलै, २०१८.

**<u>संदर्भ:</u>**

1. **शा.शि.व क्री.वि.क्रीडाधो-२०११/प्र.क्र.५५/११/क्रीयुसे-१,दि.१४ जून,२०१२**
2. **पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र २०१३/०७/प्र.क्र.४९८ (भाग-२)/ पर्यटन, दिनांक २६ जून, २०१४.**
3. **शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २०.४.२०१५.**
4. **उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, दि.११.१.२०१६ चे पत्र.**
5. **सहायक संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे दि. २७ डिसेंबर, २०१७ चे पत्र.**

**<u>प्रस्तावना :</u>**

राज्यात क्रीडा संस्कृतीचे संवर्धन, प्रचार, प्रसार व जोपासना करण्यासाठी पोषक वातावरण असणे आवश्यक आहे. याच भुमिकेतून राज्याचे क्रीडा धोरण-२०१२ घोषित करण्यात आले असून त्याची अंमलबजावणी करण्यास उपरोक्त दि. १४.६.२०१२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे.

राज्यातील एका संस्थेमार्फत हिमालयामध्ये गिर्यारोहणाकरीता गेलेल्या एका मुलाचा अपघाती मृत्यू झाला. त्या संदर्भात त्याच्या पालकांनी मुंबई उच्च न्यायालयात जनहित याचिका क्र.१८४/२००७ दाखल केली होती. या याचिकेबाबत मा.उच्च न्यायालयाने दि.१२.०७.२०१३ रोजी दिलेल्या निर्देशाव्दारे या प्रकरणी शासनाने विस्तृत धोरण/मार्गदर्शक सूचना अथवा अशा नोंदणीकृत नसलेल्या संस्थांच्या हालचालींना आळा घालण्यासाठी नियम करावेत, तसेच माऊंटनिअरींगमध्ये भाग घेणाऱ्या गिर्यारोहकांच्या सुरक्षेबाबतही राज्य शासनाने काळजी घ्यावी, असे मा.उच्च न्यायालयाने सूचित केलेले होते. त्यानुसार मा.उच्च न्यायालयाच्या मार्गदर्शक सूचनांच्या अनुषंगाने साहसी क्रीडा प्रकारातील गिर्यारोहण, माऊंटनिअरींगमध्ये, स्किईग, स्नोर्बोडींग, पॅरासेलिंग, हॅंग्लायडींग, जलक्रीडा आयोजन करणाऱ्या संस्थांसाठी मार्गदर्शक सूचना संदर्भाधीन दि.२६.०६.२०१४ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आल्या होत्या. सदरहू शासन निर्णयानुसार राज्यात साहसी प्रकारातील कार्य करणाऱ्या संस्थांची नोंदणी जिल्हास्तरावर करण्याच्या दृष्टीने जिल्हा क्रीडा अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यास तसेच या समित्यांवर नियंत्रण ठेवण्यासाठी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय शिखर समिती स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली होती.

दरम्यान उपरोक्त शासन निर्णयाच्या संदर्भात श्री.वसंत लिमये व इतर यांनी मुंबई उच्च न्यायालयामध्ये रिट याचिका क्र.८३०४/२०१४ दाखल केली आहे. त्यानुसार दि.२६.०६.२०१४ च्या शासन निर्णयामध्ये विविध त्रृटी असल्याने त्याच्या अंमलबजावणीमध्ये व्यवहारिक अडचणी उदभवून सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी करणे शक्य होणार नसल्याची बाब सदर याचिकेमध्ये प्रामुख्याने उपस्थित करण्यात आली आहे. तसेच साहसी क्रीडा प्रकारात भाग घेणा-यांच्या सुरक्षिततेबाबत मार्गदर्शक सूचना विहीत करण्यासाठी जमिनीवरील, हवाई आणि जल साहसी क्रीडा प्रकारातील प्रत्येकी २ तज्ज्ञांचा समावेश असलेली समिती नियुक्त करण्याच्या मागणीचा अंतर्भाव सदर याचिकेमध्ये करण्यात आला आहे.

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या दि.२६.०६.२०१४ च्या शासन निर्णयामध्ये आवश्यक सुधारणा करुन साहसी क्रीडा प्रकारातील जमिनीवरील, हवाई व जल क्रीडा आयोजित करणा-या संस्था/व्यक्ती यांच्याबाबत नियम/मार्गदर्शक सूचना विहित करण्याच्या दृष्टीने शासनास शिफारशीं करण्याकरिता आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने सुधारित शासन निर्णयाचा मसुदा शासनास सादर केला होता. सदर शासन निर्णयाचा मसुदा पर्यटन सांस्कृतिक कार्य विभागास अभिप्रायार्थ पाठविण्यात आला असता त्या विभागाने उपस्थित केलेल्या मुद्याच्या संदर्भात स्वयंस्पष्ट अभिप्राय विचारात घेऊन व या क्षेत्रातील काही तज्ज्ञांच्या सूचना व मत जाणून घेऊन सुधारित शासन निर्णयाचा मसुदा तयार करुन आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी शासनास सादर केला आहे. त्यानुसार याबाबत सुधारित आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय-</u>**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या सहमतीने त्या विभागाने निर्गमित केलेला संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णय अधिक्रमीत करण्यात येत आहे. साहसी क्रीडा प्रकारातील जमिनीवरील, हवाई व जल क्रीडा आयोजित करणा-या संस्था यांच्याकरिता या सोबतच्या प्रपत्र १ मध्ये दर्शविल्याप्रमाणे नियमावलीस याद्वारे मान्यता दर्शविण्यात येत आहे. गिर्यारोहण, हवाई साहसी क्रीडा व जल साहसी क्रीडा प्रकाराची व्याप्ती व योजनाबाबतच्या सूचना अनुक्रमे परिशिष्ट अ, ब, क व ड मध्ये अंर्तभूत केल्याप्रमाणे राहील.

२. सदरचा शासन निर्णय हा व्यावसायिक कारणास्तव जमिन, हवाई व जल यामधील साहसी क्रीडाप्रकार आयोजित करणारे व्यावसायिक संस्था लागू राहील यांना केंद्र शासनाच्या पर्यटन मंत्रालयाच्या दिनांक ०२/०१/२०१२ अन्वये निर्गमित झालेली व यापुढे होणारी मार्गदर्शक तत्वे यासाठी लागू राहतील व त्या अनुषंगाने त्यांनी या शासन निर्णयातील तरतूदीनुसार नोंदणी करणे आवश्यक राहील. नोंदणी करण्यासाठी अर्जाचा नमूना प्रपत्र- २ मध्ये जोडले आहे.

३. ॲडव्हेंचर टूर ऑपरेटरसाठी असलेल्या मार्गदर्शक सूचना राज्यात बंधनकारक कराव्यात तसेच साहसी क्रीडा प्रकार आयोजित करणारे व्यावसायिक यांनी आवश्यक ती नोंदणी केंद्रीय पर्यटन मंत्रालयाकडे करावी. केंद्र शासनाने दिनांक ०२ जानेवारी, २०१२ च्या पत्रानुसार प्रसारित केलेल्या मार्गदर्शक सूचना परिशिष्ट-इ मध्ये जोडले आहे.

४. जमिनीवरील क्रीडा प्रकारातील गिर्यारोहण, गिरीभ्रमण अशा उपक्रमांचे राखीव संरक्षित वने, सार्वजनिक उद्याने व अभयारण्ये या ठिकाणी जर उपक्रम राबवावयाचा असल्यास वन खात्याची परवानगी बंधनकारक राहील. हवाई साहसी क्रीडा प्रकाराकरीता DGCA (डायरेक्टोरेट जनरल ऑफ सिव्हिल एव्हिएशन) नागरी विमान महानिदेशालय, नवी दिल्ली यांची परवानगी घेणे बंधनकारक आहे. जल साहसी क्रीडा प्रकारात समुद्र व खाडीवरील साहसी क्रीडा प्रकार याकरीता महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड (MMB) यांची त्यांचे जलक्रीडा धोरणातील नमूद नियम व नियमावली बंधनकारक राहील. केंद्र शासन पर्यटन विभाग यांचेद्वारे दि.२.१.१२ रोजी दिलेली मान्यता प्राप्त साहसी पर्यटन आयोजक(ATO) म्हणून मान्यता/नुतनीकरण किंवा विस्तार करणेबाबतची मार्गदर्शक तत्वे सोबत नियमावली परिशिष्ट-इ मध्ये नमूद केल्यानुसार राहतील.

५. सदर शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौ.स.क्र. टिडीसी-२०१८/६/प्र.क्र.५६५/पर्यटन, दिनांक १०.०७.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत असून तो महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२६१३०००८५३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.07.26 15:42:55 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव.
४) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव.
५) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद यांचे सचिव.
६) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

७) सर्व विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा.
८) सर्व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद.
९) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.
१०) प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
११) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई.
१२) प्रधान सचिव,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सचिव,पर्यटन मंत्रालय,भारत सरकार, नवी दिल्ली
१४) प्रधान सचिव,परिवहन व बंदरे विभाग
१५) प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई
१७) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव /सचिव, मंत्रालय, मुंबई.
१९) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरिटाईम बोर्ड, इंडीयन मर्कन्टाईल चेंबर्स, ३ रा मजला, १४ रामजीभाई कमानी मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई ४०० ०३८.
२०) पोलिस महासंचालक, महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१) सर्व विभागीय आयुक्त,
२२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे
२३) पोलीस आयुक्त(सर्व),
२४) प्रबंधक, लोकआयुक्त व उपआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
२५) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२६) सर्व जिल्हाधिकारी.
२७) सर्व पोलिस अधिक्षक, महाराष्ट्र राज्य,
२८) सर्व अतिरिक्त जिल्हा दंडाधिकारी
२९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मुंबई.
३०) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
३१) सर्व विभागीय उप संचालक, क्रीडा व युवक सेवा.
३२) सर्व जिल्हा / तालुका क्रीडा अधिकारी.
३३) सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ.
३४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
३५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
३६) नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
३७) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.

३८)अध्यक्ष/सचिव, अखिल महाराष्ट्र गिर्यारोहक महासंघ, २०६ शिल्पीन सेंटर, ४०, जी.डी.आंबेकर मार्ग,वडाळा, मुंबई ४०० ०३१.

३९) ग्रंथपाल, विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.

४०)अवर सचिव, (क्रीयुसे - २, क्रीयुसे -३)

४१) निवडनस्ती, क्रीयुसे-१.

## प्रपत्र-१

## शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.न्यायाप्र-२०१८/प्र.क्र.१०५/क्रीयुसे-१, दि. २६ जुलै, २०१८ चे जोडपत्र

## साहसी क्रीडा प्रकार आयोजनाबाबतची नियमावली

**नियम क्र.१**

जमिनीवरील साहसी क्रीडा, जल साहसी क्रीडा, हवाई साहसी क्रीडा प्रकाराचा वापर करुन सशुल्क व जाहीरपणे आयोजित केलेले सर्व उपक्रम गिर्यारोहण (प्रस्तरारोहण, स्कीईंग, स्नो बोर्डींग इ.) हवाई क्रीडा (पॅरासेलींग, हँग्लायडींग, पॅरा मोटरींग, पॅराग्लायडींग, स्काय डायविंग / पॅरा शुटींग इ.) जल क्रीडा प्रकार (राफ्टींग, स्कुबा डायव्हींग इ.) या तीनही साहसी क्रीडा प्रकारातील कोणत्याही तंत्राचा वापर करुन केलेले उपक्रम (उदा. गिर्यारोहणाच्या एखाद्या तांत्रिक बाबीचा स्वतंत्रपणे वापर करुन केलेले पुढील उपक्रम - रॅपलिंग, वॉटरफॉल रॅपलिंग, व्हॅली क्रॉसिंग, टायरोलीन ट्रॅव्हर्स, जायंट स्विंग इ.) आयोजित करणा-या संस्थांनी या नियमाखाली नोंदणी करणे बंधनकारक आहे.

**संस्था** - ज्या संस्थेची नोंदणी संस्था अधिनियम १८६० अन्वये धर्मादाय आयुक्तांकडे नोंदणी झालेली /कंपनी कायदा २०१३ च्या कलम ८ प्रमाणे ना नफा तत्वावर झाली आहे अशा उपरोक्त कोणताही साहसी क्रीडा उपक्रम आयोजित करणारी संस्था / किंवा व्यावसायीक संस्था.

जिल्हा क्रीडा अधिका-याने उपरोक्त क्रीडा संस्थेची नोंदणी स्वतंत्र नोंदवहीत करावी. नोंदणी झाल्यानंतर संबंधित संस्थेस नोंदणी प्रमाणपत्र देण्यात यावे.

जिल्हा क्रीडा अधिका-याकडे नोंदणी झालेल्या सर्व संस्थांचे संनियंत्रण जिल्हा समितीकडे असेल.

**जिल्हा समिती रचना-**

| अ.क्र. | संस्था/पदनाम | समिती मधील पद |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | पोलीस आयुक्त/जिल्हा पोलीस अधीक्षक | सदस्य |
| ३. | कार्यकारी अभियंता, सिंचन विभाग | सदस्य |
| ४. | विभागीय वन अधिकारी | सदस्य |
| ५. | विभागीय उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, संचालनालय | सदस्य |
| ६. | जिल्हा क्रीडा अधिकारी | सह सचिव |
| ७. | संबंधीत महसूल विभागातील प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ / अतिरिक्त जिल्हादंडाधिकारी | सदस्य सचिव |
| ८. | जिल्हा शल्य चिकित्सक | सदस्य |
| ९. | साहसी क्रीडा प्रतिनिधी (जमीनीवरील साहसी क्रीडा प्रकार, जल साहसी क्रीडा प्रकार आणि हवाई साहसी क्रीडा प्रकारातील राज्यस्तरीय शिखर क्रीडा संघटनेचे संबंधीत जिल्हयाचे प्रत्येकी दोन प्रतिनिधी राज्यस्तरीय शिखर संघटना नसेल तर जिल्हयातील सभासद क्रीडा संस्थेच्या अनुभवी प्रतिनिधीची नियुक्ती करावी.) | सदस्य |

उपरोक्त प्रकारे नोंदणी झालेल्या संस्था उपरोक्त कोणताही साहसी उपक्रम आयोजित करताना सदर शासन निर्णयातील संबंधित साहसी क्रीडा प्रकारात नमूद केलेली मार्गदर्शक तत्वे लागू होतील.

वरीलप्रमाणे नोंदणी न करता जी संस्था उपरोक्त साहसी उपक्रमांचे आयोजन करत असेल तर तिच्या विरुद्ध प्रचलित कायद्यानुसार कारवाई करण्याचे अधिकार जिल्हा समितीस राहतील.

**<u>साहसी खेळ प्रकार जिल्हा समितीची कार्यकक्षा</u>**

१. या शासन निर्णयातील तरतूदींच्या बाबत प्राप्त आक्षेप व सूचना यांचा अभ्यास करुन त्याची योग्य ती दखल घेणे / वा आपल्या अभिप्रायासह राज्य समितीकडे पाठवणे.
२. जिल्हयातील सर्व साहसी खेळांचा सर्वांगीण विकास, योग्य व सुरक्षित पध्दतीचा वापर व प्रसार व्हावा यासाठी संबंधित साहसी खेळाच्या राज्य संघटनेद्वारे त्यांच्या साहसी खेळांच्या पध्दती, साधने, मानके,सुरक्षा पध्दती,प्रशिक्षण इत्यादी बाबतची मार्गदर्शक तत्वे तयार करुन घेऊन सर्व साहसी खेळांच्या मार्गदर्शक तत्वांचे संकलन करणे.
३. सर्व साहसी खेळांची जिल्हयातील सुरुवात,प्रसार,प्रगती,महत्वपूर्ण कामगिरी इत्यादी माहितीचे संकलन करणे.
४. साहसी खेळात होणा-या अपघातांची संबंधीत खेळाच्या राज्य संघटनेमार्फत माहिती संकलित करण्याची व आवश्यक असेल तर अपघातांची चौकशी करण्याची पद्धती व प्रक्रिया राज्य समितीच्या मार्गदर्शनानुसार ठरविणे.
५. साहसी क्रीडा संघटना व शासन यामध्ये समन्वय साधणे.
६. नोंदणीकृत संस्थांद्वारे केद्राच्या मार्गदर्शक सूचनांचे पालन झाल्याबाबत / होत असल्याबाबत जिल्हा समितीने शहानिशा करावी.
७. सदर क्रीडा धोरणाची योग्य अंमलबजावणीसाठी शासनास सर्वतोपरी सहाय्य करणे.
८. या समितीच्या वेळोवेळी बैठका आयोजित करूण अंमलबजावणीबाबत आढावा घेणे.
९. साहसी क्रीडा प्रकाराबाबतच्या संस्था नोंदणीबाबतच्या कार्यपध्दतीबाबत आवश्यकतेनुसार सुधारणा सुचविणे.
१०. साहसी उपक्रमाबाबतची मोहिम तेथील भौगोलिक परिस्थिती व त्यासाठी लागणाऱ्या मेडिकल बाबनिहाय कोणत्या सुविधा तसेच बचावासाठी लागणारे खेळनिहाय पॅरामेडीकल सेवासाहीत्य संबंधित आयोजकाकडे असावे याबाबतचा निर्णय जिल्हास्तर समितीने घेण्यात यावा .

**<u>नियम क्र.२</u>**

जिल्हा समित्यांवर नियंत्रण ठेवणे व त्यासाठी विनिमय तयार करण्याकरीता राज्य स्तरावर खालीलप्रमाणे एक शिखर समिती स्थापन करण्यात येत आहे.

**<u>राज्यस्तरीय समिती रचना -</u>**

| अ.क्र. | पदनाम | समिती मधील पद |
|---|---|---|
| १ | सह संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे | अध्यक्ष |
| २ | पोलीस उप आयुक्त,पुणे | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ३ | अधीक्षक अभियंता, सिंचन विभाग,पुणे | सदस्य |
| ४ | उपवन संरक्षक अधिकारी, वन विभाग,पुणे | सदस्य |
| ५ | सहायक संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे | सदस्य |
| ६ | उप संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे | सदस्य सचिव |
| ७ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई | सदस्य |
| ८ | सह संचालक, आरोग्य संचालनालय, महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य |
| ९ | साहसी क्रीडा प्रकार प्रतिनिधी-जमिनीवरील साहसी क्रीडा प्रकार, जल साहसी क्रीडा प्रकार आणि हवाई साहसी क्रीडा प्रकारातील राज्य स्तरीय शिखर क्रीडा संघटनेचे संबंधित प्रत्येकी दोन प्रतिनिधी राज्य स्तरीय शिखर संघटना नसेल तर त्या क्रीडा प्रकारातील राज्यातील दोन राष्ट्रीय स्तरावरील अनुभवी प्रतिनिधी | सदस्य |

**<u>साहसी खेळ प्रकार राज्य समितीची कार्यकक्षा</u>**

१. या शासन निर्णयातील तरतूदींच्या बाबत आक्षेप व सूचना मागवून त्यानुसार प्राप्त आक्षेप व सूचना यांचा अभ्यास करुन त्याची योग्य ती दखल घेणे.

२. शासन निर्णयानुसार साहसी खेळांच्या संस्थांच्या नोंदणी अर्जाचा नमुना तयार करणे.

३. साहसी खेळांच्या संस्थांच्या नोंदणी अर्जाच्या छाननीची व नोंदणीची पध्दत व प्रक्रीया ठरविणे.

४. राज्यात सर्व साहसी खेळांच्या सर्वांगीण विकास, योग्य व सुरक्षित पद्धतीचा वापर व प्रसार व्हावा यासाठी संबंधित साहसी खेळाच्या राज्य संघटनेद्वारे त्यांच्या साहसी खेळांच्या पध्दती, साधने, मानके, सुरक्षा पध्दती प्रशिक्षण इत्यादी बाबतची मार्गदर्शक तत्वे तयार करुन घेऊन सर्व साहसी खेळांच्या मार्गदर्शक तत्वांचे संकलन करणे.

५. सर्व साहसी खेळांच्या सर्वांगीण वाढ व प्रसारासाठी त्या त्या खेळांच्या राज्य संघटना योग्यरित्या कार्यक्षम असणे आवश्यक आहे. त्यामुळे अशा संघटना कार्यक्षमपणे कार्यरत राहण्यासाठी त्यांना योग्य ते प्रोत्साहन देणे.

६. सर्व साहसी खेळांची राज्यातील सुरुवात, प्रसार, प्रगती, महत्वपूर्ण कामगिरी इत्यादी माहितीचे संकलन करणे.

७. साहसी खेळात होणा-या अपघातांची संबंधीत खेळाच्या राज्य संघटनेमार्फत माहिती संकलित करण्याची व आवश्यक असेल तर अपघातांची चौकशी करण्याची पद्धती व प्रक्रिया ठरविणे.

८. जनतेला आवाहन करुन आयोजित केलेल्या साहसी खेळांच्या आयोजकांच्या त्रुटींबाबत त्यात सहभागी सदस्यांच्या किंवा त्यांच्या पालकांकडून प्राप्त तक्रारीच्या निवारणासाठी राज्य संघटनेमार्फत करावयाची प्रक्रीया व पद्धती ठरविणे.

९. जिल्हा स्तरीय साहसी क्रीडा समितीच्या कार्यकक्षेमध्ये आवश्यक असल्यास सुधारणा सुचविणे.

१०. साहसी क्रीडा संघटना व शासन यामध्ये समन्वय साधणे.

११. सदर क्रीडा धोरणाची योग्य अंमलबजावणीसाठी शासनास सर्वतोपरी सहाय्य करणे.

१२. सर्व साहसी खेळांच्या सर्वांगीण वाढ व प्रसारासाठी धोरणाचा आराखडा तयार करणे.
१३. कालानुरूप व आवश्यकतेनुसार याबाबत नवीन योजना तयार करून मान्यता देणे व सुधारणा सूचविणे.
१४. या योजनेची व्यवस्थित कालबध्द अंमलबजावणी करणे व त्यासाठी सर्व उपाययोजना सुचविणे.
१५. या समितीच्या वेळोवेळी बैठका आयोजित करूण अंमलबजावणीबाबत आढावा घेणे.
१६. साहसी क्रीडा प्रकाराबाबतच्या संस्था नोंदणीबाबतच्या कार्यपध्दतीबाबत आवश्यकतेनुसार सुधारित कार्यपध्दती विहीत करणे.

**नियम क्र.३**

उपरोक्त प्रकारे नोंदणी झालेल्या संस्थांकडील नेता / मार्गदर्शक /प्रशिक्षक यांची पात्रता आणि आवश्यक साधनसामुग्री खालीलप्रमाणे असेल :-

३.१ - उपरोक्त साहसी उपक्रम आयोजित करताना त्या-त्या उपक्रमाचा नेता, मार्गदर्शक, प्रशिक्षक आणि सहभागी सदस्यांकडे सोबतच्या परिशिष्टातील संबंधित क्रीडा प्रकारांत नमूद केलेले प्रशिक्षण प्राप्त करणे आवश्यक राहील.

३.२ - या शासन निर्णयानुसार नोंदणी झालेल्या उपरोक्त साहसी उपक्रमांच्या आयोजकांनी प्रशिक्षण आणि साधनसामुग्री या आधारे सुरक्षा पद्धतीचा आढावा घ्यावा. संबंधित माहिती सोबतच्या परिशिष्ट-“अ” “ब” “क” व “ड” मध्ये क्रीडा प्रकारांनुसार नमूद केली आहे.

३.३ -उपरोक्त साहसी क्रीडा उपक्रमांच्या आयोजकांकडे वैयक्तिक बचाव साधन सामग्री, संबंधित क्रीडा प्रकारांच्या राज्य /राष्ट्रीय/ आंतरराष्ट्रीय स्तरावरील शिखर संघटनांच्या मानकांनुसार यथोचितरित्या प्रमाणित केलेली असणे आवश्यक आहे. तसेच सदर खेळाचे साहित्य वरीलप्रमाणे संबंधित शिखर संघटनेकडून स्वत: प्रमाणित करुन घेणे आवश्यक आहे. अशा साधन सामग्रीबाबतचा तपशिल सोबतच्या परिशिष्ट-“अ” “ब” व “क” मध्ये क्रीडा प्रकारांनुसार देण्यात आला आहे.

३.४ -उपरोक्त कोणत्याही साहसी उपक्रमांचे आयोजन एक दिवसांपेक्षा अधिक कालावधीसाठी केले असेल तर अशावेळी पर्यावरणीय दृष्टीकोनातून स्वयंपाकाच्या इंधनाची योग्य ती तजवीज करावी.

३.५ -उपरोक्त साहसी क्रीडा उपक्रम आयोजित करताना त्या-त्या उपक्रमाचा नेता आणि प्रशिक्षक हे मान्यताप्राप्त संस्थेचे प्रमाणित प्रथमोपचार सहाय्यक (Certified First Aider) असले पाहीजे आणि जर त्यांच्याकडे असे प्रमाणपत्र नसेल तर उपरोक्त साहसी उपक्रम आयोजित करणा-या आयोजकांनी असे प्रमाणपत्र धारण केलेली व्यक्ती त्या गटाबरोबर असेल याची खात्री केली पाहीजे. असे प्रशिक्षण देणा-या सरकारमान्य प्रथमोपचार प्रशिक्षण संस्थांची माहिती खालीलप्रमाणे-

A)Red Cross (in multiple locations)

B)St. John Ambulance (in multiple locations)

C)Home Guards (in multiple locations) or Guards (in multiple locations)

३.६ -उपरोक्त साहसी उपक्रम आयोजित करताना त्या-त्या उपक्रमाचा नेता, प्रशिक्षक आणि सहभागी सदस्यांकडे सोबतच्या परिशिष्टातील संबंधित क्रीडा प्रकारांत नमुद केल्यानुसार वैद्यकीय फीटनेसचे प्रमाणपत्र असल्याची खात्री आयोजकांनी करावी.

३.७ -उपरोक्त साहसी क्रीडा उपक्रमांच्या आयोजकांकडे त्यामध्ये भाग घेणा-या सर्वांची यादी असणे आवश्यक राहील. ज्यामध्ये नाव, पूर्ण पत्ता, संपर्काचा तपशिल(दूरध्वनी/भ्रमणध्वनी, पालकांचा दूरध्वनी/भ्रमणध्वनी, ई-मेल पत्ता (वेगळा असल्यास) इ.) आणीबाणीतील संपर्काचा तपशिल इत्यादी माहितीचा समावेश असला पाहीजे.

३.८ उपरोक्त साहसी उपक्रमांच्या आयोजकांकडे प्रथमोपचार संच असणे आवश्यक राहील. तसेच संबंधित क्रीडा प्रकारांच्या निकषानुसार अशा मोहीमांच्यावेळी आवश्यक ती औषध साधनसामग्रीसह पात्र वैद्यकीय व्यावसायिकास नेमणे उचित राहील. या साहसी खेळाच्या प्रकारामध्ये प्रत्येक खेळ निहाय प्रथमोपचपार/पॅरा मेडीकल सुविधा वेगवेगळया लागू शकतात. तसेच आयोजित करण्यात आलेल्या मोहिमे दरम्यान धोकादायक परिस्थती उद्भवू शकते व त्यामध्ये दर्जेदार प्रथमोपचार व्यवस्था व अपघातग्रस्त व्यक्तीस तातडीने योग्य त्या रुग्णालयात पोहचण्यासाठी लागणारी व्यवस्था केली असणे गरजेचे आहे.

३.९ -उपरोक्त साहसी उपक्रमांच्या आयोजकांनी अशा उपक्रमाची वस्तूस्थितीदर्शक माहिती म्हणजेच त्यासाठी केलेली व्यवस्था, त्यातील अडचणी आणि धोके यांचा खराखुरा तपशिल त्यामध्ये भाग घेणा-यांना नाव नोंदणीपूर्वी लेखी/ई-मेलद्वारे उपलब्ध करुन दिला पाहीजे. याशिवाय प्रत्येक क्रीडा प्रकारांत खेळातील धोके हे संकेतस्थळावर तसेच क्रीडा प्रकाराच्या ठिकाणी दर्शनी भागावर प्रदर्शीत करण्यात यावेत.

३.१० -उपरोक्त साहसी उपक्रमांच्या आयोजकांकडे आपत्कालीन प्रसंगी करावयाच्या उपाययोजनांचा लेखी तपशिल संबंधित क्रीडा प्रकारांच्या राज्य/ राष्ट्रीय/ आंतरराष्ट्रीय स्तरावरील शिखर संघटनांच्या मार्गदर्शक तत्वानुसार असावा.

३.११ -उपरोक्त साहसी उपक्रमांमध्ये भाग घेणा-यांचे संपूर्ण विम्याचे संरक्षण उपक्रमाच्या कालावधीसाठी आयोजकांनी घेणे अपेक्षित आहे व त्याबाबतचा तपशिल सहभागी व्यक्तींना उपलब्ध करुन द्यावा.

३.१२ -देशातील/राज्यातील काही ठराविक भागात उपरोक्त साहसी उपक्रमांचे आयोजन करण्यासाठी पूर्वपरवानगी आवश्यक असते, अशा ठिकाणी उपरोक्त साहसी उपक्रम आयोजित केले जाणार असतील तर केवळ तेथील गरजेनुसार त्या राज्यातील /देशातील नियमांनुसार आयोजकांनी तेथील सक्षम प्राधिका-यांची पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहील.

३.१३ - अठरा वर्षाखालील मुलांचा समावेश करण्यासाठी त्यांच्या पालकांची लेखी संमती घेणे आवश्यक असेल. प्रत्येक दहा मुलांमागे त्या उपक्रमाचे ज्ञान असणारी सज्ञान व्यक्ती उपक्रमाच्या संपूर्ण कालावधीसाठी "काळजीवाहक" म्हणून नेमणे बंधनकारक राहील.

३.१४ -उपरोक्त साहसी उपक्रमांच्या आयोजनाची कार्यप्रणाली, मार्गदर्शक सूचना यांचे पालन हे संबंधित साहसी क्रीडा प्रकारातील राज्य/ राष्ट्रीय/ आंतरराष्ट्रीय शिखर संघटनांच्या अद्ययावत मार्गदर्शक तत्वानुसार करावे. त्याबाबतची माहिती सोबतच्या परिशिष्टातील संबधित क्रीडा प्रकारांत नमूद केलेली आहे.

३.१५ - उपरोक्त साहसी उपक्रमांचे आयोजन करणा-या संस्थांनी त्यांच्या उपक्रमांची माहिती, वैयक्तिक बचाव साधन सामग्रीची यादी व त्यांचे लॉग बुक याचा अहवाल प्रत्येक आर्थिक वर्ष संपल्यानंतर सहा महीन्यात त्यांनी नोंदणी केली आहे त्या अतिरिक्त जिल्हा दंडाधिकारी व जिल्हा क्रीडा अधिका-यांना देणे बंधनकारक राहील.

३.१६ -या शासन निर्णयान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचा उपरोक्त साहसी क्रीडा उपक्रम आयोजित करणा-यांनी अवलंब करणे बंधनकारक राहील. सदर नियमावलीचा भंग करणा-या संस्थांविरुद्ध प्रचलित कायद्यानुसार

कारवाई करण्यात येईल. नियमावलीचे पालन न करणा-या संस्थेची जिल्हा क्रीडा अधिका-याकडे केलेली नोंदणी रद्द करण्याचा अधिकार राज्य समितीस राहील.

**नियम क्र.४**

**नोंदणीची कार्यपद्धती -**

संस्था नोंदणी शुल्क - रुपये १०००/- (रुपये एक हजार फक्त)

नोंदणी केलेली संस्था उपरोक्त साहसी उपक्रम त्यांच्या वैध कालावधीत आयोजित करु शकतील. कलम ३ (पंधरा) नुसार सादर करावयाची वार्षिक माहिती जिल्हा क्रीडा अधिका-याने पाठपुरावा करुनही सादर न केल्यास संस्थेची नोंदणी रद्द करण्याचा अधिकार राज्य समितीस राहील.

सर्व संबंधितांना सूचित करण्यात येते की, साहसी क्रीडा प्रकार आयोजित करणा-या संस्थांनी जिल्हा समितीने हा शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर नोंदणी करणे बंधनकारक राहील. त्यासाठी त्यांनी संबंधित जिल्हा क्रीडा अधिका-याकडे या शासन निर्णयानुसार आवश्यक ती सर्व कागदपत्रे/प्रमाणपत्रे यासह विहीत नमुन्यात अर्ज सादर करावा. (नमूना प्रपत्र-२ येथे जोडला आहे) नोंदणीसाठी अर्ज सादर झाल्यानंतर जिल्हा क्रीडा अधिका-यांनी एक महिन्याच्या आत निकाली काढावा.

********

## प्रपत्र - २

## साहसी उपक्रमाअंतर्गत संस्थेची नोंदणी करण्यासाठी अर्ज

१. अर्जदार संस्थेचे नांव ------------- : ------------------------------------------------

२. अर्जदार संस्थेचा नोंदणीचा पत्ता: --------------------------------------------------

------------------------------------------------------------------ ---------------------------

अर्जदार संस्थेचा पत्रव्यवहाराचा पत्ता: ---------------------------------------------------

----------------------.-------------------------------------------------------------------------

-----------------------------------------------------------------------------------------

३. अर्जदार संस्थेचा ईमेल आय.डी:

अ)---------------------------------------------ब)-----------------------------------------------

४. अर्जदार संस्थेचा दूरध्वनी क्रमांक:

अ)-----------------------------ब)---------------------------------क)---------------------------------

५. अर्जदार संस्थेचा भ्रमणध्वनी क्रमांक :

अ)-----------------------------ब)---------------------------------ब)---------------------------------

६. अर्जदार संस्थेचा नोंदणी क्रमांक : (कृपया योग्य पर्याय निवडा व बरोबरची खूण करा) ( √/X)

| अ.क्र | प्रकार | (√ /X) |
|---|---|---|
| १ | धर्मादाय संस्था | |
| २ | सोसायटी कायद्यानुसार नोंदणी केलेली संस्था | |
| ३ | कंपनी कायद्यानुसार नोंदणी केलेली सेक्शन ८ कंपनी | |
| ४ | इतर --------------------------------- | |

७. अर्जदार संस्था जर साहसी खेळातील/परदेशातील सर्वोच्च संस्थेत नोंदणीकृत असेल तर त्याबाबत माहिती द्यावी व याबाबत कागदपत्रे (साक्षांकित सत्य प्रत) सोबत जोडावीत :

नोंदणी प्रकार :

नोंदणी क्रमांक नोंदणीची तारीख

नोंदणी संपण्याची तारीख

८. अर्जदार संस्थेने खालीलप्रमाणे कागदपत्रे (सांक्षांकित सत्य प्रत) सोबत जोडावीत : (लागू असणारी सर्व कागदपत्रे जोडावीत)

संस्था नोंदणी अधिनियम १८६० नोंदणी प्रमाणपत्र

नोंदणी क्रमांक -----------------------------नोंदणीची तारीख------------------------------------ ----

मुंबई पब्लीक ट्रस्ट ॲक्ट १९५० नोंदणी प्रमाणपत्र

नोंदणी क्रमांक -----------------------------नोंदणीची तारीख-----------------------------------------

संस्थेचे नोंदणी प्रमाणपत्र (कंपनी कायदा-सेक्शन ८)

नोंदणी क्रमांक -----------------------------नोंदणीची तारीख-------------------------------------------

मेमोरंडम ऑफ आर्टीकल्स/पार्टनरशिप डीड व त्याचे प्रमाणपत्र/घटना,नियमावली

पत्याच्या पुराव्यासाठी चालू इलेक्ट्रीसिटी बिल/टेलिफोन बिल/मालमत्ता टॅक्स ची पावती/भाडे करारपत्र/मालकाचे ना हरकत प्रमाणपत्र

९. अर्जदार संस्था आयकर विभागात नोंदणीबाबत माहीती :

पॅन नंबर आहे अथवा नाही (√/x)

असल्यास खाली दिलेल्या रकान्यात क्रमांक लिहावा व त्याची साक्षांकित सत्य प्रत सोबत जोडावी.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | |

टॅन नबर आहे अथवा नाही (√/x)

असल्यास खाली दिलेल्या रकान्यात क्रमांक लिहावा व त्याची साक्षांकित सत्य प्रत सोबत जोडावी.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | |

८० जी नबर आहे अथवा नाही (√/x)

असल्यास खाली दिलेल्या रकान्यात क्रमांक लिहावा व त्याची साक्षांकित सत्य प्रत सोबत जोडावी.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | |

१०. अर्जदार संस्था सेवाकर विभागात नोंदणीकृत आहे अथवा नाही (√/x)

सेवाकर विभागात नोंदणीकृत असल्यास खाली दिलेल्या रकान्यात क्रमांक लिहावा व नोंदणी प्रमाणपत्राची साक्षांकित प्रत सोबत जोडावी.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | |

११. संस्थेच्या वतीने प्रशिक्षण देण्यासाठी निवड केलेल्या प्रशिक्षकांची एकूण संख्या
या सर्व प्रशिक्षकांची यादी व त्यांच्या पात्रतेची माहिती परिशिष्ट-I मध्ये द्यावी.

१२. संस्थेच्या वतीने प्रथमोपचारासाठी प्रमाणित अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या प्रशिक्षकांची एकूण संख्या
या सर्व प्रशिक्षकांची यादी व त्यांच्या पात्रतेची माहिती परिशिष्ट-II मध्ये द्यावी.

१३. संस्थेकडे प्रथमोपचारासाठी वापरावयाचे साहित्य आहे अथवा नाही ( √/X ):
या सर्व साहित्याची यादी परिशिष्ट-III मध्ये द्यावी.

१४. संस्थेकडे साहसी उपक्रमासाठी वापरावयाचे साधनसामुग्री व साहित्य आहे अथवा नाही ( √/X ):
या सर्व साहित्याची यादी परिशिष्ट-IV मध्ये द्यावी.

१५. संस्थेद्वारे गत ३वर्षात राबविलेल्या उपक्रमांची माहिती परिशिष्ट इ मध्ये द्यावी .

१६. संस्थेद्वारे राबविलेल्या उपक्रमात गेल्या ३ वर्षात कोणत्या प्रकारची दुर्घटना घडली आहे काय (√/X)?

१७. जिल्हा समितीकडे नोंदणी करण्यासाठी नोंदणी शुल्क धनाकर्षाबद्दल माहिती -
(संस्थांनी रु.१०००/- चा धनाकर्ष जिल्हा क्रीडा अधिकारी यांचे नावे द्यावा.)

अ) धनाकर्ष क्रमांक
आ) बँकेचे नाव
इ) पत्ता
ई) दिनांक

**प्रतिज्ञापत्र**

मी/आम्ही असे प्रमाणित करतो की, सोबत नमुद साहित्य साहसी क्रीडा प्रकारांसाठी वापरण्यास सुयोग्य असून प्रशिक्षणार्थीच्या सुरक्षेच्या दृष्टीने साहित्याची स्थिती चांगली व दर्जेदार आहे. उपक्रमासाठी सुस्थितीतील साहित्य वापरायची जबाबदारी संस्थेची राहील. तसेच मी / आम्ही सादर केलेली उपरोक्त सर्व माहिती बरोबर व सत्य आहे. तरी वरील माहितीच्या आधारे कृपया आमच्या संस्थेच्या नोंदणीची प्रक्रीया पूर्ण करावी ही नम्र विनंती.

**ठिकाण :** **नाव :**

**दिनांक :** **स्वाक्षरी व संस्थेचा शिक्का**

**प्रपत्र - २**
**(पुढे चालू)**
**परिशिष्ट-।**

संस्थेच्या वतीने प्रशिक्षण देण्यासाठी निवड केलेल्या प्रशिक्षकांनी शासन मान्यता प्राप्त प्रशिक्षण संस्थेचे अभ्यासक्रम/प्रशिक्षण पूर्ण केले बाबत माहिती द्यावी.

( सदर प्रशिक्षकांची प्रशिक्षण पूर्ण केल्याबाबतची प्रमाणपत्र जोडावीत )

प्रशिक्षकांची यादी:-

| अ.क्र. | प्रशिक्षकाचे नाव | शासनमान्य संस्थांमधून घेतलेले प्रशिक्षण (उदा. गिर्यारोहणातील बेसिक कोर्स, ॲडव्हान्स कोर्स इ. ) |
|---|---|---|
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |

माहिती भरण्यासाठी वरील रकाने न पुरल्यास सदर पानाची प्रत काढावी व त्यात माहिती भरावी सदर प्रतींना अ१, अ२, अ३ इत्यादी उपक्रमांक द्यावे.

**प्रपत्र - २**
**(पुढे चालू)**
**परिशिष्ट - II**

संस्थेच्या वतीने प्रथमोपचारासाठी प्रमाणित अभ्यासक्रम पुर्ण केलेल्या प्रशिक्षकांची यादी व माहिती द्यावी. (सोबत सदर प्रशिक्षकांची प्रमाणित अभ्यासक्रम पूर्ण केल्याबाबतची प्रमाणत्र जोडावीत.)

| अ. क्र. | प्रशिक्षकाचे नाव | प्रमाणित अभ्यासक्रमाचे नाव | प्रशिक्षण घेतलेले ठिकाण | वर्ष | श्रेणी | वैधता आहे अथवा नाही |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |

माहिती भरण्यासाठी वरील रकाने न पुरल्यास सदर पानाची प्रत काढावी व त्यात माहिती भरावी सदर प्रतींना ब१, ब२, ब३ इत्यादी उपक्रमांक द्यावे.

**प्रपत्र - २**

**(पुढे चालू)**

**परिशिष्ट- III**

संस्थेच्या वतीने प्रथमोचारासाठी वापरण्यात येणाऱ्या साधनांची यादी

( सोबत सदर साधनांची यादी तसेच इतर काही माहिती असल्यास सदर माहिती जोडावी )

| अ.क्र. | साधनाचे नाव | तपशिल |
|---|---|---|
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |

माहिती भरण्यासाठी वरील रकाने न पुरल्यास सदर पानाची प्रत काढावी व त्यात माहिती भरावी सदर प्रतींना क१, क२, क३ इत्यादी उपक्रमांक द्यावे.

**प्रपत्र - २**

**(पुढे चालू)**

**परिशिष्ट- IV**

संस्थेकडे साहसी उपक्रमासाठी वापरण्यात येणाऱ्या साधनांची संख्या, साहित्य प्रमाणित आहे अथवा नाही इत्यादी माहितीची यादी.

( सोबत सदर साधनांची इतर काही माहिती असल्यास सदर माहिती जोडावी )

| अ.क्र. | साधनाचे नाव | संख्या | स्पेसिफिकेशन (उदा. लांबी, अकार, क्षमता इ.) | साधन शासन नियमानुसार प्रमाणित आहे अथवा नाही (√/X) | प्रणिति असल्यास त्याचा प्रकार (उदा. UIAA, CE) |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |

माहिती भरण्यासाठी वरील रकाने न पुरल्यास सदर पानाची प्रत काढावी व त्यात माहिती भरावी सदर प्रतींना ड१, ड२, ड३ इत्यादी उपक्रमांक द्यावे.

**प्रपत्र - २**

**(पुढे चालू)**

**परिशिष्ट - V**

संस्थेद्वारे गत १ वर्षात राबविलेल्या उपक्रमांची माहिती

(सदर रकान्यात सदस्य संख्या दिलेली आहे किती सदस्यांमागे किती प्रशिक्षक होते हे लिहावे.)

| अ क्र. . | उपक्रमाचा प्रकार | उपक्रमाचे ठिकाण | कालावधी | सदस्य संख्या | साहसी प्रशिक्षकांची संख्या | प्रथमोपचारासाठी प्रशिक्षकांची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |

माहिती भरण्यासाठी वरील रकाने न पुरल्यास सदर पानाची प्रत काढावी व त्यात माहिती भरावी सदर प्रतींना अ,ब,क इत्यादी उपक्रमांक द्यावे.

## परिशिष्ट-अ

## गिर्यारोहण

गिर्यारोहण उपक्रमाबाबत जागतिक शिखर संघटना म्हणून कार्यरत असलेली इंटरनॅशनल माउंटेनियरिंग अँड क्लाइंबिंग फेडरेशन (युआयएए) या संघटनेची स्थापना १९३२ मध्ये करण्यात आली. भारतातील गिर्यारोहण क्षेत्राची शिखर संघटना असलेली इंडियन माउंटेनियरिंग फाउंडेशनची स्थापना १९५७ मध्ये करण्यात आली. तर महाराष्ट्रातील गिर्यारोहण संस्थांची राज्य शिखर संघटना म्हणून कार्यरत असलेली अखिल महाराष्ट्र गिर्यारोहण महासंघ ही संघटना १९९२ मध्ये स्थापन झाली आहे. गिर्यारोहण साहसी क्रीडा प्रकारचे तंत्र, प्रशिक्षण,साधने, त्यांचे प्रमाणिकरण, त्यांची देखभाल अशा सर्व बाबींबाबतची मार्गदर्शक तत्वे उपरोक्त आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय व राज्य संघटनेने वेळोवेळी ठरवून दिली आहेत.

**गिर्यारोहण साहसी क्रीडा प्रकाराची व्याप्ती खालीलप्रमाणे:-**

**१) गिरीभ्रमण –** अति उंचीवरील गिरीभ्रमण (हाय अल्टीटयूट ट्रेकींग)-डोंगरावरील पायवाट/ट्रेक मार्ग/डोंगर उतार यांवर केलेली पायी भटकंती म्हणजे गिरीभ्रमण (ट्रेकिंग) ज्यात गिर्यारोहणाचे कोणतेही तंत्र किंवा सुरक्षा साधने यांची आवश्यकता नसते. तर सर्वसाधारणपणे समुद्रसपाटीपासून २४४० मीटर (८००० फूट) पेक्षा जास्त उंचीवरील डोंगररांगांत पायवाट/ट्रेक मार्ग/डोंगर उतार यांवर केलेली पायी भटकंती म्हणजे अती उंचावरील गिरीभ्रमण (हाय अल्टीटयुड ट्रेकींग) ज्यात गिर्यारोहणाचे कोणतेही तंत्र किंवा सुरक्षा साधने यांची आवश्यकता नसते.

**२) प्रस्तरारोहण** – प्रस्तरखंड /प्रस्तर सुळके /प्रस्तर भिंती यावर प्रस्तरारोहणाचे तांत्रिक कौशल्य आणि साधनांचा वापर करुन केलेले आरोहण.

**३) गिर्यारोहण-** अतिउंचीवरील शिखरांवर गिर्यारोहणाचे तांत्रिक कौशल्य आणि सुरक्षा साधनांचा वापर करुन केलेले आरोहण.

गिर्यारोहणाच्या तांत्रिक बाबीचा स्वतंत्रपणे वापर करुन पुढील उपक्रम आयोजित केले जातात. रॅपलिंग, वॉटरफॉल रॅपलिंग, व्हॅली क्रॉसिंग, टायरोलीन ट्रॅव्हर्स, जायंट स्वींग इत्यादी. सदर उपक्रम स्वतंत्रपणे आयोजित केले जात असले तरी ते उपक्रम गिर्यारोहणाचा भाग आहेत.

**गिरीभ्रमण (ट्रेकिंग), अति उंचीवरील गिरीभ्रमण, प्रस्तरारोहण व गिर्यारोहण यासाठीची पात्रता, प्रशिक्षण, कार्यप्रणाली याबाबतची मार्गदर्शक तत्वे खालीलप्रमाणे:-**

**१.१ प्रस्तरारोहण** – प्रस्तरारोहण उपक्रमांचे आयोजन इंडियन माउंटेनिअरींग फाउंडेशन या राष्ट्रीय शिखर संघटनेच्या/ अखिल महाराष्ट्र गिर्यारोहण महासंघ या राज्य शिखर संघटनेच्या मार्गदर्शक तत्वांनुसार करावे.

**१.२ गिर्यारोहण** – हिमालयातील गिर्यारोहण मोहीमांचे संपूर्ण नियमन इंडीयन माउंटेनिअरींग फाउंडेशन या राष्ट्रीय संघटनेमार्फत केले जाते. अशा मोहीमांचे नेतृत्व करणारे व त्यात भाग घेणारे गिर्यारोहक यांची पात्रता, प्रशिक्षण, अनुभव याबाबतचे निकष इंडीयन माउंटेनिअरींग फाउंडेशनने ठरविलेले आहेत. त्या निकषांनुसार हिमालयातील गिर्यारोहण मोहीमांचे आयोजन करावे.

**१.३ आयोजकाची पात्रता -** गिर्यारोहण मोहीमांमध्ये भाग घेण्याबाबत आवश्यक प्रशिक्षण इंडीयन माउंटेनिअरींग फाउंडेशनच्या (आयएमएफ) मान्यताप्राप्त प्रशिक्षण संस्थांमधून पूर्ण करावे लागते. सध्या आयएमएफची मान्यता असणा-या देशातील प्रशिक्षण संस्था खालीलप्रमाणे.

१.हिमालयन माउंटेनियरींग इन्स्टिटयूट, दार्जिलिंग, पश्चिम बंगाल.

२.नेहरु इन्स्टिटयूट ऑफ माउंटेनियरींग, उत्तरकाशी, उत्तरांचल.

३.अटल बिहारी वाजपेयी इन्स्टिटयूट ऑफ माउंटेनियरींग अँड अलाइड स्पोर्टस, मनाली, हिमाचल प्रदेश.

४.जवाहर इन्स्टिटयूट ऑफ माउंटेनियरींग अँड विंटर स्पोर्टस, पहलगाम, जम्मू-काश्मीर.

५. इंडियन इन्स्टिटयूट ऑफ स्किइंग अँड माउंटेनियरींग, गुलमर्ग,जम्मू-काश्मीर

आयएमएफ मान्यतेसंदर्भात अद्ययावत माहितीसाठी http://www.indmount.org ही वेबसाईट तपासावी.

**१.४ आयएमएफ मान्यताप्राप्त प्रशिक्षण संस्थांशी संलग्न असणाऱ्या प्रशिक्षण संस्था -** गार्डीयन गिरीप्रेमी इंन्स्टिटयूट ऑफ माउंटेनियरींग पुणे ही संस्था आयएमएफशी व हिमालयन माउंटेनियरींग इन्स्टिटयूट, दार्जिलिंग, पश्चिम बंगाल आणि अटल बिहारी वाजपेयी इन्स्टिटयूट ऑफ माउंटेनियरींग अँड अलाइड स्पोर्टस, मनाली, हिमाचल प्रदेश या प्रशिक्षण संस्थाशी सलग्न असलेली प्रशिक्षण संस्था आहे.

**१.५ गिर्यारोहणाचे अन्य प्रकार -** गिर्यारोहणासाठी निकष तसेच गिर्यारोहणात तांत्रीक बाबींचा स्वतंत्रपणे वापर करुन आयोजित केलेले रॅपलिंग, वॉटरफॉल रॅपलिंग, व्हॅली क्रॉसिंग, टायारोलीन ट्रॅव्हर्स, जायंट स्विंग इत्यादी सारख्या उपक्रमांसाठी गिर्यारोहणाचे जे तंत्र वापरावे लागते त्या तंत्राचे आवश्यक निकष व नियम त्या उपक्रमांना लागू होतील.

**१.६ साधनसामुग्री-** गिर्यारोहणातील साधन सामुग्रीचे प्रमाणीकरण करण्याचे कार्य इंटरनॅशनल माउंटेनियरिंग अँड क्लाइंबिंग फेडरेशन (युआयएए www.theuiaa.org) मार्फत केले जाते. त्यांनी प्रमाणित केलेली वैयक्तिक बचाव साधने गिर्यारोहण करताना वापरणे आवश्यक आहे. गिर्यारोहणासाठी वापरली जाणारी साधनसामुग्रीची देखभाल, साठवणूक आणि तपासणी ही अत्यंत गरजेची आहे. हे कार्य त्या त्या साधन सामुग्रीच्या उत्पादकाने दिलेल्या सूचनेप्रमाणे व गिर्यारोहणाच्या आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय राज्य शिखर संघटना यांनी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार करावे. तसेच सदर खेळाचे साहित्य वरीलप्रमाणे संबंधित शिखर संघटनेकडून स्वत: प्रमाणित करुन देणे आवश्यक आहे.

**१.७ सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना -** १) उपरोक्त साहसी उपक्रमांच्या आयोजकांकडे प्रथमोपचार संच असणे आवश्यक राहील.

२) संबंधित क्रीडा प्रकारांच्या निकषानुसार अशा मोहीमांच्यावेळी आवश्यक ती औषध साधनसामग्रीसह पात्र वैद्यकीय व्यावसायिकास नेमणे उचित राहील.

३) साहसी खेळाच्या प्रकारामध्ये प्रत्येक खेळ निहाय प्रथमोपचार/पॅरा मेडीकल सुविधा वेगवेगळया लागू शकतात.

४) आयोजित करण्यात आलेल्या मोहिमे दरम्यान धोकादायक परिस्थती उद्भवू शकते त्याकरिता दर्जेदार आवश्यक ती प्रथमोपचार व्यवस्था व अपघातग्रस्त व्यक्तीस तातडीने योग्य त्या रुग्णालयात पोहचण्यासाठी लागणारी व्यवस्था केली असणे गरजेचे आहे.

५) जमिनीवरील साहसी क्रीडा प्रकारात शारिरीक दुखापत किंवा मृत्यू सुध्दा येऊ शकतो आणि प्रत्येक सहभागी या खेळात स्वत:च्या जबाबदारीवर सहभागी होत असल्याचे हमीपत्र घेण्यात यावे.

६) जोखमीबाबतची माहिती पत्रकाद्वारे सर्व सहभागी सदस्यांना व कुटुंबातील सदस्यांना दिली पाहिजे.

७) आवश्यकते नुसार सहभागी सदस्याचा विमा उतरविला असणे आवश्यक आहे.

********

## परिशिष्ट - ब

## हवाई साहसी क्रीडा

### १) पॅराग्लाईडिंग

१) **आयोजकाची पात्रता**

अ) **प्रशिक्षक/सहप्रशिक्षक** पॅराग्लाईडर प्रशिक्षक (Chief Flying Instructor-CFI)/ सहप्रशिक्षक (Assistant Instructor) यांचेकडे पॅराग्लाईडर प्रशिक्षकाचे मान्यताप्राप्त राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय संस्थेचे प्रमाणपत्र असणे आवश्यक आहे.

आ) त्यांनी मान्यताप्राप्त संस्थेचे किमान दर्जाचे प्रथमोपचार प्रशिक्षण घेतलेले असले पाहिजे.

इ) त्यांनी किमान ३ वर्षे उड्डाण व या तीन वर्षांत कमीत कमी २०० तास हवेत उड्डाणाचा अनुभव असले पहिजे.

त्यांनी FAI आंतरराष्ट्रीय संस्थेच्या मार्गदर्शक तत्वानुसार प्रशिक्षण पूर्ण केलेले असले पाहिजे.

**२) साधनसामुग्री**

अ) पॅराग्लाईडिंगसाठी वापरण्यात येणारे विंग, हार्नेस, रेस्क्यू / रिझर्व्ह पॅराशुट, हेल्मेट ही साधने LTF, DHV, EN किंवा FAI या आंतरराष्ट्रीय संस्थेने प्रमाणित केलेली असली पाहिजे.

आ) सर्व साधन सामग्रीसाठी योग्य ते लॉग बुक ठेवण्यात आले पाहिजे.

इ) प्रशिक्षक म्हणून पात्र असलेल्या निरीक्षकामार्फत या क्रीडा प्रकारात वापरण्यात येणा-या साहित्याच्या पात्रतेबाबत /त्याच्या हवेतील गुणवत्तेबाबत (Air Worthiness) वार्षिक निरीक्षण करण्यात आले पाहिजे.

ई) या साधन सामग्रीची व त्याच्या वापराबाबतची माहिती प्रशिक्षणार्थीना देण्यात यावी.

उ) प्रशिक्षण संस्थेने या क्रीडा प्रकारासाठी सर्वांगीण लॉग बुक आणि दस्ताऐवज ठेवले पाहिजेत.

**३) हवामानाची परिस्थिती (Weather Condition)**

साधन सामग्रीच्या उत्पादकाने ठरवून दिलेल्या हवामानाच्या परिस्थिती प्रमाणे हा साहसी क्रीडा प्रकार चालविला पाहिजे.

**४) दस्तऐवज**

**I) प्रशासकीय**

अ) उड्डाणाची जागा (Flying site), प्रशिक्षण संस्था यांचा तपशिल.

आ) पॅराग्लाईडिंग असोसिएशन ऑफ इंडिया (PAI) यांच्या वार्षिक निरीक्षणासाठी आवश्यक कागदपत्रे, प्रशिक्षकांची यादी व त्यांच्या संबधित प्रमाणपत्राच्या प्रती.

इ) सार्वजनिक व अन्य दायीत्वाबाबत काढलेल्या विम्याचे पुरावे.

**(II) कार्यात्मक (Operational)**

अ) दैनिक कार्यवाही दर्शविणारे लॉग बुक.

आ) अपघात / घटना अहवालाची कागदपत्रे.

इ) साधन सामग्रीची तपासणी केल्याची नोंदवही आणि करावयाचा रोजनामा.

ई) पॅराग्लाईड साधन सामग्रीच्या प्रमाणपत्रांचे दस्तऐवज.

उ) धोक्याचे आकलन आणि व्यवस्थापन आराखडा.

ऊ) आणीबाणीच्या कार्यपद्धतीची माहिती पुस्तिका.

ऋ) साधन सामग्रीच्या उत्पादनाबाबतची माहिती पुस्तिका.

**(III) या मोहिमेत भाग घेणा-यांना आणि भेटी देणा-यांना द्यावयाची माहिती.**

अ) घडामोडींचे वर्णन आणि सुरक्षिततेे बाबत सूचना.

आ) हवामान, वैद्यकीय आणि वयोमर्यादा आणि अन्य बंधने.

इ) वैयक्तिक व सार्वजनिक विम्याबाबतची माहिती.

ई) पॅराग्लाईडिंग हा साहसी खेळ असून त्यात शारीरिक दुखापत किंवा मृत्यू सुद्धा येऊ शकतो आणि प्रत्येक सहभागी या खेळात स्वत:च्या जबाबदारीवर सहभागी होत असल्याचे हमीपत्र घेण्यात यावे .

**५) <u>सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना-</u>**

१. पायलटकडे पॅराग्लायडिंग असोसिएशन ऑफ इंडिया (PAI) ने जारी केलेले वैध PG४ रेटिंग कार्ड किंवा FAI क्रॉस कंट्री (ब्राऊन) तत्सम प्रमाणपत्र असावे.

२. या प्रमाणपत्र अथवा रेटकार्ड बरोबरच पायलटकडे कमीत कमी १५० तासांच्या Air Timeअनुभवाचा लिखित पुरावा असावा.

३. पायलटने SIV अभ्यासक्रम पूर्ण केले पाहिजे त्याचा पुरावा सादर करणे आवश्यक आहे.

४. उड्डाण करण्यासाठी पायलट वैद्यकीयदृष्ट्या सक्षम असावे.

५. पायलटने दारू, अंमली पदार्थांचे किंवा इतर तत्सम उत्तेजक द्रव्यांचे सेवन करू नये.

६. टॅन्डम ऑपरेटर / पायलटने व त्यांच्याबरोबर उड्डाण करणाऱ्या व्यक्तीने Paragliding साठी प्रमाणित साधनसामग्री व शिरस्त्राणाचा वापर केला पाहिजे.

७. Passenger च्या जीवाला धोका प्राप्त होईल अशा कोणत्याही परिस्थितीत उड्डाण करू नये तसेच passenger च्या इच्छेविरुद्ध अशी कोणतीही कृती करू नये.

८. Passenger ला या खेळातील जोखीम व धोके यांची माहिती दिली आहे याची खात्री करून घ्यावी. तसेच पायलटने कोणत्याही प्रवाशाला खाली उतरायचे असल्यास उड्डाण सुरु ठेवण्यासाठी भाग पडू नये.

<u>२) पॅरासेलींग (Parasailing):-</u> भारतामध्ये हवेतील खेळासाठी Airo Club of India ही शिखर संस्था असून ती FAI या आंतरराष्ट्रीय क्रिडा संस्थेशी संलग्न आहे.

Parasailing या क्रीडा प्रकाराचे नियंत्रण राष्ट्रीय अथवा आंतरराष्ट्रीय Airo Sports संस्थेकडून मान्यता प्राप्त आयोजकांमार्फत चालवले जाते.

**१) <u>आयोजकांची पात्रता</u>** :-

अ) **Parasail** चालक किंवा मार्गदर्शक यांचेकडे राष्ट्रीय अथवा आंतरराष्ट्रीय मान्यताप्राप्त संस्थेचे प्रमाणपत्र असले पाहीजे.

आ) मान्यताप्राप्त आणि योग्य ती पात्रता धारण करणा-या संस्थेकडून प्रथमोपचाराचे किमान प्रशिक्षण घेतलेले असले पाहीजे.

**२) साधनसामुग्री-**

अ) Parasail Wing हे APCUL, DHV, CEN किंवा FAI या आंतरराष्ट्रीय संस्थेचे कोणतेही मान्यताप्राप्त प्रमाणपत्र असले पाहीजे. सदर प्रमाणपत्र Parasail Wing वर दर्शनी भागात लावले पाहीजे आणि ते निरीक्षणासाठी दिसेल असे वाचावे. या काळात वापरण्यात येणारे हार्नेस सुध्दा प्रमाणित केलेल्या असल्या पाहीजेत. तसेच सदर खेळाचे साहित्य वरीलप्रमाणे संबंधित शिखर संघटनेकडून प्रमाणित करुन देणे आवश्यक आहे.

ब) पॅरासेलींगच्या उपक्रमात भाग घेणा-यांनी,पाण्यावरुन हवेत तरंगत असताना योग्य बांधणीचे मान्यताप्राप्त लाईफ जॅकेट घातले पाहीजे. तसेच जमिनीच्या वर हवेत तरंगत असताना आयएसआय मान्यताप्राप्त हेल्मेट घालणे आवश्यक आहे.

क) सर्व साधन सामग्रीसाठी योग्य ते लॉगबुक ठेवण्यात आले पाहीजे.

ड) प्रशिक्षक म्हणून पात्र असलेल्या निरिक्षकामार्फत या क्रिडा प्रकारात वापरण्यात येणा-या साहीत्याची त्याच्या हवेतील गुणवत्तेबाबत /पात्रतेबाबत वार्षिक निरिक्षण करण्यात आले पाहीजे.

इ) या साधन सामग्रीची वापरण्यासाठीची माहीती पुस्तिका आणि परिरक्षण पुस्तिका निर्मात्यामार्फत तयार करण्यात येऊन त्याच्या प्रती संबंधितांना देण्यात येतील .

ई) आयोजकांनी पॅरासेल , टो रोप यांचे सर्वसाधारण लॉगबुक आणि दस्तऐवज ठेवले पाहीजेत.

**३) हवामानाची परिस्थिती:-** साधन सामुग्रीच्या उत्पादकाने ठरवून दिलेल्या हवामानाच्या परिस्थिती प्रमाणे हा साहसी क्रीडा प्रकार चालविला पाहिजे.

**४) दस्तऐवजाबाबत -**

**I) प्रशासकीय -**

अ) मार्ग आणि आयोजक (ऑपरेटर) यांचा तपशिल .

आ) निरिक्षण करणा-या संस्थांनी वार्षिक निरिक्षण केल्याचे दर्शविणारे कागदपत्रे, मार्गदर्शकांची त्यांच्या संबंधित प्रमाणपत्राच्या प्रतींसह यादी.

इ) सार्वजनिक आणि अन्य दायत्वाबाबत काढलेल्या विम्याचे पुरावे.

**II) कार्यात्मक (Operational) -**

अ) दैनिक कार्यवाही दर्शविणारे लॉगबुक

आ) अपघात/घटना अहवालाची कागदपत्रे .

इ) साधन सामग्रीची तपासणी केल्याची नोंदवही आणि करावयाचा रोजनामा.

ई) पॅरासेल प्रमाणपत्राचे दस्तऐवज.

उ) धोक्याचे आकलन आणि व्यवस्थापन आराखडा .

ऊ) आणीबाणीच्या कार्यपध्दतीची माहीती पुस्तिका .

ऋ) निर्मात्याच्या उत्पादनाबाबतची माहीती पुस्तिका .

ऌ) चालु तपासणी अहवाल .

**III) या मोहीमेत भाग घेणा-यांना आणि भेटी देणा-यांना दयावयाची माहीती:**

अ) घडामोडींचे वर्णन आणि सुरक्षिततेबाबत सूचना.

आ) हवामान,वैदयकीय आणि वयोमर्यादा आणि अन्य बंधने.

इ) वैयक्तीक व सार्वजनिक विम्याबाबतची माहीती.

**५) कार्यप्रणाली (Operations) :-**

अ) ऑपरेटरला उड्डाण घेण्यासाठी सुरक्षित आणि खुली जागा उपलब्ध असणे आवश्यक आहे.

आ) उड्डाण करावयाची ठिकाणे अडथळा विरहीत असली पाहीजेत आणि उड्डाणाच्या मार्गात मोठे दगड अथवा कोणत्याही प्रकाराची पिके वगैरे काहीही असता कामा नये ज्याच्यामुळे या मोहीमेत भाग घेणा-याला इजा होऊ शकते.

इ) आकाशातून खाली उतरण्याचा मार्गसुध्दा उंची, झाडे, इमारती, विदयुत वायर अशा अडथळयांपासून मुक्त असला पाहीजे.

ई) उड्डाण तसेच उतरण्याच्या ठिकाणी पात्र प्रथमोपचार मार्गदर्शकासह (अशा क्रिडा प्रकारातून घडणा-या अपघातांचे ज्ञान असलेला ) प्रथमोपचाराची सोय उपलब्ध असली पाहीजे. तसेच तातडीच्या सेवेसाठी जवळच्या हॉस्पीटलला जाण्यासाठी व्यवस्था असली पाहीजे.

उ) हवेचे अडथळे - ऑपरेटरकडे हवामानाचे मोजमाप यंत्र असले पाहीजे आणि जेथे हवेचा वेग ताशी २५ कि.मी.पेक्षा जास्त आहे त्या ठिकाणी हे क्रिडा प्रकार करू नयेत.ऑपरेटरने नेहमीच समुद्र किनारे किंवा निश्चित केलेली स्थळे यांच्या पासून ५०० फुटापेक्षा कमी नाही इतक्या अंतरावरून ऑपरेट केले पाहीजे.

३) <u>पॉवर्ड पॅराग्लायडर /पॉवर्ड हँग्लायडर</u>

१) <u>आयोजकांची पात्रता</u> - (ORGANIZER & INSTRUCTOR)

**पायलट /मार्गदर्शक/पर्यायी पायलट**

अ) पॉवर्ड पॅराग्लायडर /पॉवर्ड हँग्लायडर हे अदययावत असले पाहीजेत आणि पायलट /मार्गदर्शक/ पर्यायी पायलट यांचेकडे पायलट /मार्गदर्शक/ पर्यायी पायलट यांचे मान्यताप्राप्त राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय संस्थेचे प्रमाणपत्र असणे आवश्यक आहे.

आ) त्यांनी योग्यता प्राप्त आणि मान्यताप्राप्त संस्थेचे किमान दर्जाचे प्रथमोपचाराचे प्रशिक्षण केलेले असले पाहीजे.

इ) त्यांनी किमान २०० दिवस उडडाण आणि कमीत कमी २०० तास हवेत तरंगलेले असले पाहीजे.

**२) साधन सामुग्री :**

अ) या प्रकारच्या उपक्रमात भाग घेणा-यांनी, पाण्यावरुन हवेत तरंगत असताना योग्य बांधणीचे मान्यताप्राप्त लाईफ जॅकेट घातले पाहीजे. तसेच जमिनीच्या वर हवेत तरंगत असताना आयएसआय मान्यताप्राप्त हेल्मेट घालणे आवश्यक आहे.तसेच सदर खेळाचे साहित्य वरीलप्रमाणे संबंधित शिखर संघटनेकडून प्रमाणित करुन घेतल्याबाबत स्वत: प्रमाणित करुन देणे आवश्यक आहे.

आ) सर्व साधन सामुग्रीसाठी योग्य ते लॉग बुक ठेवण्यात आले पाहीजे.

इ) प्रशिक्षक म्हणून पात्र असलेल्या निरीक्षकामार्फत या क्रीडा प्रकारात वापरण्यात येणा-या साहीत्याची त्याच्या हवेतील गुणवत्तेबाबत /पात्रतेबाबत वार्षिक निरीक्षण करण्यात आले पाहीजे.

ई) या साधन सामुग्रीची वापरण्यासाठीची माहीती पुस्तिका आणि परिरक्षण पुस्तिका निर्मात्यामार्फत तयार करण्यात येऊन त्याच्या प्रती संबंधितांना देण्यात येतील.

उ) आयोजकांनी या क्रीडा प्रकारासाठी सर्वांगिण लॉगबुक आणि दस्तऐवज ठेवले पाहीजेत.

**३) हवामानाची परिस्थिती** (Weather Condition)

हवामानाच्या परिस्थीतीचे सक्तपणे संनियंत्रण करून हवामानाच्या परिस्थितीप्रमाणे उत्पादकाकडून ठरवून दिल्याप्रमाणे हे साहसी क्रिडा प्रकार चालवले पाहीजेत.

**४) दस्तऐवज**

**i) प्रशासकीय –**

अ) मार्ग आणि आयोजक (ऑपरेटर) यांचा तपशिल

आ) निरिक्षण करणा-या संस्थांनी वार्षिक निरिक्षण केल्याचे दर्शविणारे कागदपत्रे, मार्गदर्शकांची त्यांच्या संबंधित प्रमाणपत्राच्या प्रतीसह यादी.

इ) सार्वजनिक आणि अन्य दायित्वाबाबत काढलेल्या विम्याचे पुरावे.

**II) कार्यात्मक** (Operational) –

अ) दैनिक कार्यवाही दर्शविणारे लॉगबुक

आ) अपघात/घटना अहवालाची कागदपत्रे.

इ) साधन सामग्रीची तपासणी केल्याची नोंदवही आणि करावयाचा रोजनामा.

ई) धोक्याचे आकलन आणि व्यवस्थापन आराखडा.

उ) आणीबाणीच्या कार्यपध्दतीची माहीती पुस्तिका.

ऊ) निर्मात्याच्या उत्पादनाबाबतची माहीती पुस्तिका.

ऋ) चालु तपासणी अहवाल .

**या मोहीमेत भाग घेणा-यांना आणि भेटी देणा-यांना दयावयाची माहीती:**

अ) घडामोडींचे वर्णन आणि सुरक्षिततेबाबत सूचना.

आ) हवामान, वैदयकीय आणि वयोमर्यादा आणि अन्य बंधने.

इ) वैयक्तीक व सार्वजनिक विम्याबाबतची माहीती.

**४. पॅराशुटिंग / स्कायडायव्हिंग** (Parachuting / Skydiving)

भारतामध्ये हवेतील खेळासाठी ॲरो क्लब ऑफ इंडिया ही शिखर संस्था असून, ती एफ.अे.आय. या आंतरराष्ट्रीय क्रीडा संस्थेशी संलग्न आहे. (F. A. I. Federation Aeronautic International)

पॅराशुटिंग/स्कायडायव्हिंग या क्रीडा प्रकाराचे नियंत्रण राष्ट्रीय अथवा आंतरराष्ट्रीय ॲरो स्पोर्ट्स संस्था (एफ. अे. आय) संस्थेकडून मान्यता प्राप्त आयोजकामार्फत चालवले जाते.

१) आयोजकांची व प्रशिक्षकाची पात्रता – (Organizer & Instructor)

**अ)** पॅराशुट चालक किंवा पॅराशुटिंग किंवा स्कायडायव्हिंग मार्गदर्शक किंवा पॅराशुट पॅकिंग करणारे पॅकर यांचेकडे राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय मान्यता प्राप्त संस्थेचे प्रमाणपत्र असले पाहिजे. (Valid F.A.I. Federation of Aeronautic International or USPA Recognized Licenses)

**ब)** मान्यता प्राप्त आणि योग्य ती पात्रता धारण करणाऱ्या संस्थेकडून किमान प्रशिक्षकाची पात्रता असलेले प्रशिक्षण घेतलेले असले पाहिजे.

**क)** आयोजकांनी जर हि मोहीम व्यवस्थीत प्रयोजनार्थ आयोजित केली असेल तर मार्गदर्शक पथकाची Biographical माहिती देण्यात यावी.

**ड)** पॅराशुटिंगसाठी लागणाऱ्या साधन सामग्रीची वापरण्यासाठीची माहिती पुस्तिका आणि परीक्षण पुस्तिका निर्मात्यामार्फत तयार करण्यात येऊन त्यांच्या प्रती संबंधितांना देण्यात येतील.

२) <u>साधन सामुग्री</u> (Equipments)

**अ)** पॅराशुटमधील रिझर्व्हड पॅराशुट १८० दिवसांचे आत केलेले असावे. त्या सोबत पॅराशुट रिपॅकिंगचे मान्यता प्राप्त प्रमाणपत्र असले पाहिजे. सदर प्रमाणपत्र पॅराशुटच्या आतील भागात परीक्षणासाठी दिसेल असे असावे. पॅराशुटिंग करताना वापरण्यात येणारे हेल्मेट, अल्टीमिटर, डिटर इत्यादी साधने प्रमाणित केलेल्या कंपनीचेच असावेत. F. A. I. (Federation Aeronautic International) चे नियम पाळले पाहिजे.

**ब)** पॅराशुटिंगच्या कुठल्याही प्रकारात भाग घेणाऱ्यांनी जम्पला जाताना व हवेत असताना हेल्मेट्स, अल्टीमिटर, डिटर घालणे आवश्यक आहे.

**क)** सर्व साधन सामग्रीसाठी योग्य ते लॉगबुक ठेवण्यात आले पाहिजे.

**ड)** F.A.I.Federation Aeronautic International मान्यता प्राप्त प्रशिक्षक म्हणून पात्र असलेल्या निरीक्षकामार्फत या क्रीडा प्रकारात वापरण्यात येणाऱ्या साहित्याची त्यांच्या हवेतील गुणवत्तेबाबत / पात्रतेबाबत सहामाही निरीक्षण करण्यात आले पाहिजे. तसेच सदर खेळाचे साहित्य वरिल प्रमाणे संबधित शिखर संघटनेकडून प्रमाणित करून घेणे आवश्यक आहे.

३) <u>हवामानाची परिस्थिती</u> – (Weather Conditions)

हवामानाच्या परिस्थितीचे सक्तपणे संनियंत्रण करून हवामानाच्या परिस्थितीप्रमाणे उत्पादकाकडून ठरवून दिल्याप्रमाणे हे साहसी क्रीडा प्रकार चालविले पाहिजेत. हवामान पॅराशुटिंग खेळास अनुकूल नसल्यास, पॅराशुटिंग सुरक्षिततेच्या दृष्टीने पुढे ढकलण्यात यावेत किंवा रद्द करण्यात यावेत.

४) <u>दस्त ऐवजाबाबत</u> –(Documentations)

I) <u>प्रशासकीय</u> (Official)

**अ)** निरीक्षण करणाऱ्या संस्थांनी वार्षिक निरीक्षण केल्याचे दर्शविणारे कागदपत्रे, मार्गदर्शकांची त्यांच्या संबंधित प्रमाणपत्राच्या प्रतीसह यादी बनवलेली असावी.

**ब)** स्थानिक जिल्हाधिकारी किंवा पोलीस आयुक्त/ पोलिस अधिक्षक यांचेकडून आवश्यक ती परवानगी घेतलेली असावी.

**क)** स्थानिक एअर ट्रॅफिक कंट्रोल (ए. टी. सी.) कडून आवश्यक ती परवानगी घेतलेली असावी.

**ड)** नजीकच्या भारतीय वायुसेना विमानतळावरून (एअरफोर्स ) कडून आवश्यक असेल ती परवानगी आवश्यक असेल तरच घ्यावी.

II) <u>कार्यात्मक</u> (Operational Documents)

**अ)** दैनिक कार्यवाही दर्शविणारे लॉगबुक सोबत असावे.

**आ)** अपघात / घटना अहवालाची कागदपत्रे सोबत असावीत.

**इ)** साधन सामग्रीची तपासणी केल्याची नोंदवही सोबत असावी.

**ई)** पॅराशुट व इतर साधन सामग्री प्रमाणपत्राचे दस्तऐवज सोबत असावेत.

**उ)** चालू मोहिमेच्या आवश्यक त्या परवानग्या अनुज्ञप्तींच्या सर्व प्रती सोबत असाव्यात.

**III) पॅराशुटिंग चालू मोहिमेत भाग घेणायां-ना आणि भेटी देणाऱ्यांना द्यावयाची माहिती**.

**अ)** सुरक्षिततेबाबत सूचना देणारे दस्त ऐवज देण्यात यावेत.

**आ)** हवामान, वैद्यकीय आणि वयोमर्यादा आणि अन्य बंधने दर्शविणारे दस्त ऐवज देण्यात यावेत.

**इ)** ओळखपत्राच्या प्रती, विमा काढल्याचे कागदपत्र आणि भाग घेणाऱ्यांच्या मार्गदर्शकांच्या आणि प्रशिक्षकांच्या जवळच्या नातलगांचा तपशील असणे आवश्यक राहील.

आकस्मिक संपर्क क्रमांकाची अद्ययावत यादी बनविण्यात यावी.

५) <u>कार्यप्रणाली</u> (Operations)

**अ)** पॅराशुटरला उडी घेण्यासाठी सुरक्षित खुली जागा उपलब्ध असावी. विमानातून स्कायडायव्हिंग करण्यासाठीच्या सर्व आवश्यक परवानगी (डि. जी. सी. ए. प्रमाणित) घेतलेल्या असाव्यात. (Follow guidelines of F. A. I. & D.G.C.A)

**ब)** लॅण्डींग करण्याचे ठिकाण अडथळा विरहित असले पाहिजेत. लॅण्डींगच्या मार्गात मोठे दगड अथवा कोणत्याही प्रकारची पिके, कुंपण व पाण्याचे धरण, डोंगर, रेल्वेलाईन, इमारती वगैरे असता कामा नये. ज्यामुळे पॅराशुट लॅण्डींग करणाऱ्याला इजा होणार नाही.

**क)** आकाशातून खाली उतरण्याच्या मार्गात सुद्धा उंच झाडे, इमारती, विद्युत वायरी व खांब अशा प्रकारचे अडथळे नसावेत.

६) <u>धोके कमी करणे -</u> (Risk Mitigation)

**अ) वॉकीटॉकी** - कोणताही पॅराशुटिंग प्रकार हवेत करीत असताना, वॉकीटॉकी लावल्याशिवाय करू नये. वॉकीटॉकी वापरकर्त्याच्या शरीरावर योग्य त्या ठिकाणी बांधलेले पाहिजे.

**ब)** अल्कोहोल किंवा ड्रग्ज घेतलेले आढळल्यास, त्या व्यक्तीस पॅराशुटिंग करण्यास परावृत्त करण्यात यावे.

**क) साईनबोर्ड** - कोणताही पॅराशुटिंग प्रकार विद्यार्थी खेळाडूने प्रशिक्षकाशिवाय करू नये असा स्पष्ट नियम असलेला सूचना फलक लावलेला असावा.

**ड)** कोणताही पॅराशुटिंग प्रकार अंधारात करू नये आणि अंधार पडण्याच्या एक तास आधी सर्व हवाई खेळ थांबवावेत (सूर्यास्तानंतर हवाई खेळ करावयाचे असतील तर, आवश्यक त्या परवानग्या घेणे जरुरी आहे.)

**इ)** पॅराशुटिंग क्रीडा प्रकारात भाग घेणाऱ्यांना वैद्यकीय तपासणी प्रमाणपत्र घेणे सक्तीचे असावे.

७) <u>आणीबाणी आणि बचावकार्य</u> - (Emergencies & Rescues)

**अ)** उड्डाण तसेच लॅण्डींगच्या ठिकाणी पात्र प्रथमोपचार मार्गदर्शकासह (अशा क्रीडा प्रकारातून घडणाऱ्या अपघातांचे ज्ञान असलेला) प्रथमोपचाराची सोय उपलब्ध असली पाहिजे, तसेच तातडीच्या सेवेसाठी जवळच्या हॉस्पिटलला जाण्यासाठी व्यवस्था असली पाहिजे. (On board Doctor, Ambulance & Fire Truck - Compulsory)

**ब)** पॅराशुटिंगच्या वेळी देण्यात येणाऱ्या माहिती पुस्तिकेमध्ये वापरण्यात येणारी साधन सामग्री व पॅराशुटिंग करताना काय करायचे व काय नाही (Do`s & Dont's ) याची माहिती दिलेली असावी.

**क)** पॅराशुटिंगमध्ये भाग घेण्यापूर्वी त्यामध्ये असलेल्या तीव्र धोक्याची जबाबदारी आयोजकाची राहणार नाही, याबाबत ठळक स्वरूपाचे बंधपत्र या क्रीडा प्रकारात भाग घेणाऱ्यांकडून लिहून घेण्यात यावे.

**ड)** पॅराशुटिंग या क्रीडा प्रकारात भाग घेणारा खेळाडू एखाद्या वैद्यकीय कारणास्तव भाग घेण्यास वैद्यकीय दृष्ट्या सक्षम नसेल, तर त्याला तसे पॅराशुटिंग सुरु होण्यापूर्वी सांगून त्याला भाग घेण्यापासून परावृत्त केले पाहिजे.

**इ)** उपरोक्त साहसी उपक्रमांच्या आयोजकांकडे प्रथमोपचार संच असणे आवश्यक राहील. तसेच संबंधित क्रीडा प्रकारांच्या निकषानुसार अशा मोहीमांच्यावेळी आवश्यक ती औषध साधनसामग्रीसह पात्र वैद्यकीय व्यावसायिकास नेमणे उचित राहील. या साहसी खेळाच्या प्रकारामध्ये प्रत्येक खेळ निहाय प्रथमोपचपार/पॅरा मेडीकल सुविधा वेगवेगळया लागू शकतात. तसेच आयोजित करण्यात आलेल्या मोहिमे दरम्यान धोकादायक परिस्थती उद्भवू शकते व त्यामध्ये दर्जेदार प्रथमोपचार व्यवस्था व अपघातग्रस्त व्यक्तीस तातडीने योग्य त्या रुग्णालयात पोहचण्यासाठी लागणारी व्यवस्था केली असणे गरजेचे आहे.

*********

## परिशिष्ट - क

## जल साहसी क्रीडा प्रकार

नैसर्गिक व कृत्रिम जलाशयामध्ये नौकांच्या साहयाने केलेले विविध प्रकार, स्कुबा डायव्हिंग, वॉटर राफ्टींग, स्पोर्टसचे विविध प्रकार उदा.वॉटर स्किइंग, स्नोव्हेलिंग, बोट टाईंगचे विविध प्रकार, वॉटर पॅरासेलिंग, फ्री डायव्हिंग, क्लीफ डायव्हिग, केव्ह डायव्हिंग इ. सर्व जल साहसी क्रीडा प्रकारांसाठी संबंधित स्थापित राज्य, राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय संघटनांचे नियम व मार्गदर्शक तत्वे यांचे पालन करावे.

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे, महाराष्ट्र राज्यातील समुद्र किनारा व खाडी या ठिकाणी आयोजित करण्यात येणा-या जल क्रीडा उपक्रमांवर अधिकार व नियंत्रण आहे. त्यामुळे राज्यातील समुद्र किनारा व खाडी या ठिकाणी आयोजित करण्यात येणा-या जल क्रीडा उपक्रमांसाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे नियम व मार्गदर्शक तत्वे यांचे पालन करावे लागेल.

तसेच महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या जलक्रीडा धोरणात नमूद केलेले जल क्रीडा प्रकार राज्यातील इतर कोणत्याही ठिकाणच्या जलाशयात, नदीत आयोजित करावयाचे असतील तर महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या जलक्रीडा धोरणात नमूद केलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार सदर जलक्रीडा प्रकाराचे आयोजन करण्यात यावे.

**महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाच्या अधिकारात असलेले जल क्रीडा प्रकार-**

१) मोटोराइज -पॉवर क्राफ्ट रेसींग, वॉटर पॅरासेलिंग, बेअर फुट स्किईंग, सर्फिंग, वेक बोर्डींग, वॉटर स्किईंग, विंड सर्फिंग.

२) नॉनमोटोराइज - वॉटर राफ्टींग, डिंगी सेलिंग, काईट सर्फींग, स्टँड अप पॅडल सर्फींग, स्कीम बोर्डीग.

**(एक) मार्गदर्शक/प्रशिक्षक:-**

अ) योग्यता प्राप्त व मान्यता प्राप्त संस्थेचे कमीत कमी १६ तासांचे (२ दिवसांचे) प्रथमोपचार प्रमाणपत्र.

आ) जलक्रीडेतील विशिष्ट प्रकाराबाबत राष्ट्रीय अथवा आंतरराष्ट्रीय मान्यता प्राप्त संस्थेची अर्हता प्राप्त असली पाहीजे. आणि आयोजकाचे सदर व्यक्तीस जलक्रीडेतील विशिष्ट प्रकारात सहाय्य करण्याच्या ३ वर्षाचा अनुभव असल्याचे व गटांना स्वतंत्रपणे मार्गदर्शन करण्याची क्षमता असल्याचे प्रमाणपत्र पाहीजे

इ) इंटरनॅशनल मेरीटाईम रेस्क्यू फेडरेशन च्या मार्गदर्शक तत्वानुसार बेसिक ॲक्वाटीक लाईफ सेव्हींग चे प्रशिक्षण पुर्ण केलेले असावे.

३) **(दोन) साधन सामुग्री (Equipment):-**

अ) आय एस आय, अमेरिकन कोस्टगार्ड, ब्रिटीश कनॉय किंवा तत्सम संस्थांनी मान्य /प्रमाणित केलेली लाईफ जॅकेटस किंवा तरंगती उपकरणे असली पाहीजेत. तसेच सदर खेळाचे साहित्य वरिल प्रमाणे संबधित शिखर संघटनेकडून प्रमाणित करून घेणे आवश्यक आहे.

आ) तात्काळ वापरासाठी फेकता येण्याजोगी बचाव उपकरणे उपलब्ध असली पाहीजेत.

इ) बचाव कार्यवाहीसाठी /सुरक्षिततेसाठी तात्काळ उपयोगात आणण्यासाठी नजरेच्या टप्यात असेल इतक्या जवळच्या अंतरावर बोट, त्यावर बचाव कार्यवाही पार पाडण्यासाठी योग्य अर्हता धारण करणा-या व्यक्तीसह उपलब्ध असली पाहीजे.

**(तीन) कार्यप्रणाली : -**

जलक्रीडेचे सर्व प्रकार सुरक्षिततेबाबत सविस्तर माहीती दिल्यावरच सूरू केले पाहीजेत. देण्यात येणा-या माहीतीमध्ये वापरण्यात येणारी साधन सामुग्री, काय करायचे व काय नाही (Do॰s and Don॰ts) जलक्रीडा प्रकारांसाठी सीमा रेषा आखुन घेणे , बचाव आणि आणीबाणीच्या प्रसंगीची कार्यपध्दती ठरविणे. जलक्रीडेत भाग घेण्यापूर्वी त्यामध्ये असलेल्या तीव्र धोक्याची जबाबदारी आयोजकाची राहणार नाही याबाबत ठळक स्वरूपाचे बंधपत्र या क्रीडा प्रकारात भाग घेणा-यांकडून लिहून घेण्यात यावे. जलक्रीडा प्रकारात भाग घेणारा एखादा वैद्यकीय कारणास्तव भाग घेण्यास वैद्यकीय दृष्टया सक्षम नसेल तर त्याला तसे जलक्रीडा सुरू होण्यापूर्वी सांगून त्याला भाग घेण्यापासून परावृत्त केले पाहीजे.

धरण क्षेत्रामध्ये धरणाच्या भिंतीपासून २ कि.मी. अंतराच्या पुढे कनोयीग कयाकींग या सारख्या Non Motorise Sports करिता संबंधित अधिक्षक अभियंता यांची परवानगी घेण्यात यावी. हे क्षेत्र ज्या पोलीस स्टेशनच्या हद्दीत येते त्या पोलीस स्टेशनला अशा स्पर्धाची माहिति देवून त्याची NOC घेण्यात यावी.

**(चार) धोके कमी करणे :**

१. लाईफ जॅकेट - कोणतीही जलक्रीडा पाण्यात असेपर्यत लाईफ जॅकेट लावल्याशिवाय करू नये. लाईफ जॅकेटला तरंगण्याची क्षमता असली पाहीजे आणि ते योग्य रीतीने बांधले पाहीजे व योग्य रीतीने तपासले पाहीजे. ते वापरकर्त्याच्या योग्य त्या आकाराचे असले पाहीजे.
२. लाईफ गार्डस :- प्रशिक्षीत लाईफ गार्डशिवाय कोणतीही जलक्रीडा सूरू करू नये.
३. जलक्रीडा करताना अल्कोहोल/ड्रग्जचे सेवन / वापर करण्यास मनाई करावी.
४. साईन बोर्ड:- कोणतीही जलक्रीडा पर्यवेक्षक असल्याशिवाय सूरू करू नये असा स्पष्ट नियम असलेला सुचना फलक लावावा.
५. कोणतीही जलक्रीडा प्रकार अंधारात करू नये आणि अंधार पडण्याच्या १ तास आधी जलक्रीडा थांबवावी.
६. जल साहसी क्रीडा प्रकारात शारीरिक दुखापत किंवा मृत्यू सुद्धा येऊ शकतो आणि प्रत्येक सहभागी या खेळात स्वतच्या जबाबदारीवर सहभागी होत असल्या:चे हमीपत्र घेण्यात यावे .

**<u>(पाच) विहीत संचलन प्रणाली आणि कालावधीबाबत सूचना</u>**

१. सर्व जलक्रीडा आयोजकांनी त्यांच्या कार्यप्रणालीबाबत अद्ययावत विहीत संचालन प्रणाली (SOP) ठेवावी.
२. संस्थेने जलक्रीडा आयोजित करताना स्विकारलेल्या कार्यपध्दती बरोबरच सदस्याचा अनुभव व वैद्यकीय अवस्था याचा अंदाज घ्यावा. जलक्रीडा सुरू करण्यासाठीची कार्यपध्दती Avoidance of Injury, सुरक्षिततेचे उपाय, दळणवळण, हवामान, आपत्कालीन कार्यपध्दती, अपघात समयीचे बचाव कार्य, घडलेला अपघात व घटनांचा तपशिल देणे, माहीती घेणे (feedback) याबरोबरच SOP मध्ये खालील बाबींचा समोवश असावा-

अ) जलक्रीडा क्षेत्राच्या परिसरातील वैद्यकीय सुविधा निश्चित करण्यात याव्यात.

आ) कार्यक्षम बचावाच्या कार्यक्षम उपाययोजना पुर्वनिश्चित कराव्यात.

इ) आयोजकांनी जाहीरातीमध्ये या जलक्रीडा मध्ये असलेल्या सर्व अडचणी व धोक्यांचे वास्तवचित्र स्पष्ट करावे आणि अशक्य दावे करू नये.

ई) आयोजकांनी जर ही मोहीम व्यावसायिक प्रयोजनार्थ आयोजित केली असेल तर मार्गदर्शक पथकाची Biographical माहीती देण्यात यावी.

**(सहा) दस्तऐवज**

या क्रीडा प्रकाराच्या आयोजकांकडे खालील कागदपत्रे/दस्तऐवज असावेत:

१) सर्व मार्गदर्शक आणि प्रशिक्षक यांचा पूर्ण तपशिल ज्यामध्ये प्रमाणपत्राची प्रत, मोहीमेच्या अनुभवाचे अभिलेख आणि भाग घेणा-यांना दिलेल्या माहीतीचा समावेश असेल.

२) चालू मोहीमेच्या परवानग्या व अनुज्ञप्तींच्या सर्व प्रती.

३) ओळखपत्राच्या प्रती, विमा काढल्याचे कागदपत्र आणि भाग घेणा-यांच्या मार्गदर्शकाच्या आणि प्रशिक्षकांच्या जवळच्या नातलगांचा तपशिल असणे आवश्यक राहील.

४) Standard Operating Procedure ची प्रत.

५) आकस्मिक संपर्क क्रमांकाची अदययावत यादी.

**(सात) आपत्काल व बचाव कार्य**

अ) पथकाकडे प्रथमोपचार व वैदयकीय साधन सामग्री पुरेशी असावी.

आ) मार्गदर्शक/प्रशिक्षक आणि सहभागी यांना बचावाचे मार्ग व ज्ञान असावे.

इ) पथकाकडे बचावाचे आणि आपत्कालीन कार्यव्यवस्थेचा सविस्तर आणि दस्तऐवजी कार्यक्रम उपलब्ध असला पाहीजे. त्यामध्ये अत्यंत नजिकच्या आपत्कालीन सेवेची माहीती असावी, जेणेकरून त्यांना आवश्यकतेनुसार बोलवता येईल.

ई) या साहसी खेळाच्या प्रकारामध्ये प्रत्येक खेळ निहाय प्रथोमपचार /पॅरामेडीकल संविधा वेगवेगळया लागू शकतात. तसेच आयोजित करण्यात आलेल्या मोहिमे दरम्यान धोकादायक परिस्थिती उद्भवू शकते ज्या प्रकारचे अपघात होवून त्यानुसार होणा-या विशिष्ट प्रकारच्या इजांना दर्जेदार प्रथमोपचार करुन अपघाताचा बळी ठरलेल्या व्यक्तीस तातडीने योग्य त्या रुग्णालयात पोहचण्यासाठी सर्व प्रथमोपचार/पॅरा मेडीकल सेवा तसेच अपघातग्रस्त व्यक्तींना हालविण्यासाठी लागणारे वाहन याची व्यवस्था असणे गरजेचे आहे. पॅरा मेडीकलमध्ये लागणा-या सुविधा/औषधोपचार काय असाव्यात याबाबत आरोग्य विभागाने स्वतंत्रपणे कार्यवाही करावी.

उ) उपरोक्त साहसी उपक्रमांच्या आयोजकांकडे प्रथमोपचार संच असणे आवश्यक राहील. तसेच संबंधित क्रीडा प्रकारांच्या निकषानुसार अशा मोहीमांच्यावेळी आवश्यक ती औषध साधनसामग्रीसह पात्र वैद्यकीय व्यावसायिकास नेमणे उचित राहील. या साहसी खेळाच्या प्रकारामध्ये प्रत्येक खेळ निहाय प्रथमोपचपार/पॅरा मेडीकल सुविधा वेगवेगळया लागू शकतात. तसेच आयोजित करण्यात आलेल्या मोहिमे दरम्यान धोकादायक परिस्थती उद्भवू शकते व त्यामध्ये दर्जेदार प्रथमोपचार व्यवस्था व अपघातग्रस्त व्यक्तीस तातडीने योग्य त्या रुग्णालयात पोहचण्यासाठी लागणारी व्यवस्था केली असणे गरजेचे आहे.

************

## परिशिष्ट-ड

## साहसी खेळातील सुरक्षा आणि सुटका याबाबत मार्गदर्शक तत्त्वे

**ओळख :**

१.१ साहसी पर्यटन आयोजक म्हणजे भारतात साहसी पर्यटनाशी संबधित जसे जल क्रीडा, हवाई क्रीडा, गिर्यारोहण आणि ट्रेकिंग, वेगवेगळ्या स्वरूपाच्या सफारी इत्यादी उपक्रमात कार्यरत असलेला.सर्व साहसी खेळांसाठी सर्वसाधारण मार्गदर्शक तत्त्वे

२.१ साहसी क्रीडेत भाग घेणाऱ्या व्यक्तींच्या प्रत्येक गटासोबत नेता या पदावर नियुक्त केलेली व्यक्ती असली पाहिजे.

२ .२ नमूद केल्याप्रमाणे योग्य अर्हता व कौशल्य प्राप्त असावा.

२.३ साहसी खेळात कार्यरत असलेल्या गटात सामील होणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला प्राथमिक प्रशिक्षण प्राप्त झालेले असले पाहिजे आणि त्यांनी सहभागी होण्यासाठी आवश्यक कौशल्य प्राप्त केले आहे याबाबत नेता समाधानी असला पाहिजे.

२.४ नेत्याकडे प्रथमोपचार प्रमाणपत्र असले पाहिजे आणि स्ट्रेचरचा उपयोग केला जात असताना प्रथमोपचार प्रशिक्षण देण्याची क्षमता असली पाहिजे.

२.५ शोध कार्यप्रणालीशी नेता परिचित असावा आणि त्याने गटातील सर्व सदस्यांना सदर कार्यप्रणालीबाबत माहिती दिली पाहिजे.

२.६ जर कोठे रेडीओ वापरला जाणार असेल तर गटातील सर्व सदस्य त्याच्याशी परिचित असावेत.

२.७ हेलिकॉप्टर कार्यप्रणालीबाबत नेता परिचित असावा, त्याला हेलिकॉप्टरशी कसा संपर्क साधावा याची माहिती असावी आणि त्याच्या खाली सोडणे आणि वर उचलण्याच्या कार्यप्रणालीची माहिती असावी.

२.८ कोणत्याही हवामानात, दिवसा किंवा रात्री, नकाशा व होकायंत्र यांचा वापर करण्यात नेता निष्णात असावा.

२.९ साहसी खेळात भाग घेण्यास सर्व सभासद वैद्यकीय दृष्ट्या सक्षम असल्याची नेत्याची खात्री असली पाहिजे.

२.१० प्रत्येक साहसी खेळासाठी वापरली जाणारी सर्व साधने सुरक्षिततेची सर्व परिमाणे पूर्ण करणारी असल्याबाबत नेत्याने स्वतःचे समाधान केलेले असले पाहिजे.

२.११ कोणत्याही परिस्थितीत,साधन सामुग्रीच्या उत्पादकाने त्यांच्या प्रमाणित केलेल्या क्षमतेचे उल्लंघन होता कामा नये, अतिरिक्त सुरक्षितता याव्यतिरिक्त कोणताहि अनधिकृत बदल करण्यात येऊ नये किंवा कनिष्ठ दर्जाची साधने वापरण्यात येऊ नयेत.

२.१२ उपक्रमाचे स्वरूप, उपक्रमाचा परिसर, उपक्रमाचा कालावधी, संभावित अडचणी, आपात्कालीन संपर्काच्या व्यक्ती आणि सहभागी सदस्यांची यादी याची माहिती संबधित सुरक्षा व सुटका समितीला देण्यात यावी.

२.१३ हाताने हाताळता येणारे, आपत्ती वर्गवारी सिग्नल देण्याची क्षमता असलेले योग्य साधन भारतात योग्य किमतीत उपलब्ध झाले तर ते साहसी पर्यटकांच्या गटाला उपलब्ध करून दिले पाहिजे.

२.१४ अर्हताप्राप्त डॉक्टर बोलावल्यावर येण्यासाठी उपलब्ध असावा.

२.१५ भ्रमणध्वनी / वॉकीटॉकी इत्यादी संपर्काची साधने उपलब्ध असली पाहिजे.

**गिर्यारोहण आणि ट्रेकिंगसाठी मार्गदर्शक तत्त्वे:-**

३.१ गिर्यारोहण मोहिमेतील सर्व सदस्य या खेळात भाग घेण्यासाठी पुरेसे अर्हताप्राप्त असणे आवश्यक आहे. यासाठी राष्ट्रीय प्रशिक्षण प्रशालेने दिलेले प्राथमिक प्रशिक्षण प्रमाणपत्र पुरसे मानले जाईल.

३.२ गिर्यारोहण मोहिमेचा नेता भारतीय पर्वतारोहण संस्थेने मान्यता दिलेली पुरेशी अर्हता प्राप्त केलेला असावा.

३.३ गिर्यारोहण मोहिमेचे आणि ट्रेकिंग गटाचे सदस्य शारीरिक दृष्ट्या तंदुरुस्त असले पाहिजे.

३.४ गिर्यारोहण आणि ट्रेकिंगसाठी वापरली जाणारी साधने यु.आय.ए.ए. प्रमाणित किंवा भारतीय पर्वतारोहण संस्थेने मान्यता दिलेली असावीत.

३.५ सुटकेची साधने उदा. दोर, हार्नेस, पुली सिस्टम आणि पोर्टेबल स्ट्रेचर हे योग्य आवरणात त्यावर मोठ्या अक्षरात **सुटकेची साधने** असे लिहून स्वतंत्र उपकरणासारखी राखली पाहिजे.

**जल क्रीडेसाठी मार्गदर्शक तत्त्वे:-**

४.१ सर्व नेते व मार्गदर्शक यांच्याकडे योग्य प्रमाणपत्र किंवा मान्यताप्राप्त संस्था किंवा असोसिएशन यांचे लायसेन्स असणे आवश्यक आहे. त्यांना संबंधित खेळाचा पुरेसा अनुभव असावा.

४.२ सर्व नेते व मार्गदर्शक उत्कृष्ट पोहणारे असावेत आणि जल सुटका, प्रथमोपचार आणि सी.पी.आर (कार्डीओ पल्मनरी रिसक्सीटॅशन) प्रणालीत उत्तम प्रकारे प्रशिक्षित असावेत.

४.३ सुटका बोट नेहमी दृष्टीक्षेपात असली पाहिजे किंवा जल क्रीडेत कार्यरत असलेल्या व्यक्तीशी रेडियोद्वारे संपर्कात असली पाहिजे. खेळाच्या आवश्यकतेनुसार सुटका बोट यांत्रिक किंवा अयांत्रिक असू शकेल परंतु त्यात प्रथमोपचार साधने, अतिरिक्त लाईफ जॅकेट आणि फेकण्यासाठी दोरी / सुटका पिशवी असावी. नदीतील क्रीडा प्रकारासाठी, किमान दोन बोटी (उदा. दोन राफ्ट किंवा एक राफ्ट आणि एक/दोन सुरक्षितता/सुटका कयाक) आवश्यक आहे.

४.४ सर्व सभासदांनी तरंगत राहणारे योग्य साधन आणि जेथे आवश्यकता असेल तेथे डोक्याची उपकरणे घालणे आवश्यक आहे. नदीतील क्रीडा प्रकारासाठी शिरस्त्राण आवश्यक आहे.

४.५ पाण्यात पडण्याची शक्यता असेल अशा जल क्रीडेत सहभागी सर्व सदस्य पोहणारे असणे आवश्यक आहे.

४.६ सर्व साधने योग्य व्यक्तीच्या मार्फत किंवा उत्पादकामार्फत प्रत्येक मोसमात किंवा सहा महिन्यात, जे कमी असेल ते, तपासणे आवश्यक आहे.

४.७ प्रत्येक बोटीसाठी / क्राफ्टसाठी नोंद पुस्तिका ठेवणे आवश्यक आहे. ज्याच्यामध्ये वापर, तपासणी, दुरुस्ती आणि बदल याच्या नोंदी असतील. नदीतील नोंद पुस्तिका हि नदीतील राफ्टींग उपक्रमाच्या नोंदीसाठी ठेवण्यात यावी.

४.८ उपक्रम स्थानापासून लांब असणाऱ्या सर्व बोटींमध्ये प्रथमोपचार साधने, आपत्कालीन साधने आणि दुरुस्ती साधने असणे आवश्यक आहे. त्यांनी जेथे आवश्यक असेल तेथे दिशा दर्शक साधने सोबत घेणे आवश्यक आहे.

४.९ सर्व बोटींमध्ये उत्पादकाने शिफारस केलेली किमान साधने आणि उपसाधने यांची यादी प्रदर्शित करावी.

४.१० संभावित धोक्यांची सूचना याच्यासह बोटीची क्षमता वर्गवारी सर्व वापरकर्त्यांना प्रामुख्याने दिसतील असे प्रदर्शित करावेत.

४.११ निषिद्ध औषधे आणि मादक द्रव्ये यांच्या अंमलाखाली असलेल्या कोणत्याही व्यक्तीस सहभागी होण्यास परवानगी देण्यात येऊ नये.

४.१२ घटना आणि अपघात यांची माहिती ताबडतोब संबधित सुरक्षा समितीला देण्यात यावी.

४.१३ वैद्यकीय बाबी : जे गंभीर आजाराने त्रस्त आहेत उदा. कमजोर ह्रदय, मेंदूचा विकार, पाठ / मणक्याचा त्रास (जसे स्लीप डिस्क) आणि गरोदर महिला यांना नदीतील क्रीडा / स्कुबा डायव्हिंग सारख्या उपक्रमात सहभागी करून घेऊ नये.

४.१४ वयोमर्यादा : जल क्रीडा प्रकारासाठीची वयोमर्यादा सर्व छापील साहित्यात आणि उपक्रमाच्या मुख्य स्थानात प्रामुख्याने प्रदर्शित करणे आवश्यक आहे. नदीतील सर्व क्रीडा प्रकारासाठी वयोमर्यादा १४ वर्षे किंवा अधिक, तरंगते उपक्रम (स्तर-२) साठी १० वर्षे किंवा अधिक. नदीतील विभाग / स्थिती यानुसार उपक्रमाच्या नेत्याला वयोमर्यादा १ किंवा २ वर्षाने शिथिल करता येईल.

४.१५ जबादारीतून मुक्तता पत्रक ग्राहकाने नदीतील सहलीपूर्वी सही करणे आवश्यक आहे. त्यात स्पष्टपणे नमूद केले पाहिजे की या खेळात मूलतः धोके अंतर्भूत आहेत.

४.१६ नदीतील खेळामध्ये, नदीत असताना लाईफ जॅकेट सतत घातलेले असले पाहिजे. लाईफ जॅकेट योग्य प्रकारे बांधलेले असावेत आणि किमान ८-९ कि.ग्रा. तरंगण्याची क्षमता असणारे योग्य लाईफ जॅकेट वापरण्यात यावेत. फुगविले जाणारे लाईफ जॅकेट नदीतील उपक्रमात वापरण्यात येऊ नयेत.

**हवाई क्रीडेसाठी मार्गदर्शक तत्त्वे:-**

५.१ सर्व हवाई क्रीडा प्रकार मान्यताप्राप्त संस्था, क्लब किंवा असोसिएशन यांचे लायसेन्स किंवा योग्य प्रमाणपत्र धारक प्रशिक्षक किंवा मार्गदर्शक यांच्या अधिपत्याखाली आयोजित करण्यात यावेत.

५.२ पायलट आणि पॅराशूटच्या साह्याने उतरणारे सर्व यांची वैद्यकीय तपासणी करण्यात आलेली असावी आणि ते हवाई क्रीडेत भाग घेण्यासाठी पात्र असल्याचे प्रमाणित करण्यात आलेले असावेत.

५.३ वैद्यकीय दृष्ट्या प्रवासी पात्र असावा आणि त्याला आपत्कालीन प्रणालीची माहिती दिलेली असावी.

५.४ सर्व हवाई क्रीडा प्रकार दिवसा उजेडी आयोजित केले जावेत.

५.५ यांत्रिक उड्डाण परवानगी, उदा. मायक्रो लाईट आणि यांत्रिक हॅंग ग्लायडर अशांच्या नियंत्रित हवाई क्षेत्रातील उड्डाणासाठी संबधित हवाई वाहतूक नियंत्रण विभागाची परवानगी घेणे आवश्यक आहे. अनियंत्रित हवाई क्षेत्रातील उड्डाण भरण्यासाठी व खाली उतरण्यासाठी परवानगी देण्यास जबाबदार व्यक्ती स्थानावर उपलब्ध असली पाहिजे.

५.६ यंत्र विरहीत उड्डाणासाठी, उदा. हँग ग्लायडिंग आणि पॅराग्लायडिंग करताना लॉंच मास्टर उड्डाणाच्या स्थानावर आणि उतरण्याच्या क्षेत्रात, उतरण्याचा विभाग सुरक्षा अधिकारी हजर असावा.

५.७ योग्य प्रशिक्षित व्यक्तीसह प्रथमोपचार साधने नेहमी उपलब्ध असली पाहिजेत.

५.८ पायलट, प्रवासी आणि पॅराशूटच्या साह्याने उतरणारे या सर्वांनी बचाव शिरस्त्राण घालणे आवश्यक आहे.

५.९ सर्व हवाई क्रीडा उपक्रम आकाश ढग विरहित असताना, पृष्ठभाग दृष्टीक्षेपात असताना आणि एक नॉटिकल माईल दृश्यमानता असताना करणे आवश्यक आहे.

५.१० निषिद्ध औषधे आणि मादक द्रव्ये यांच्या अंमलाखाली असलेल्या कोणत्याही व्यक्तीस हवाई क्रीडेत सहभागी होण्यास परवानगी देण्यात येऊ नये.

५.११ टक्कर टाळण्यासाठी नियम : (या नियमांकरिता मायक्रो लाईट आणि यांत्रिक हँग ग्लायडर इत्यादी हवाई जहाज असे वाचण्यात यावेत)

१. कोणतेही हवाई जहाज त्यांची टक्कर होण्याचा धोका निर्माण होईल अशा पद्धतीने उडवू नये.

२. रचनाकार पद्धतीने उड्डाणाची शिफारस करण्यात येत नाही.

३. दुसऱ्या हवाई जहाजापासून पुरेसे अंतर नसेल तर त्याच्या खालून, वरून किंवा समोरून जाणे सर्व हवाई जहाजांनी टाळले पाहिजे.

४. खालील उंचीवरीलहवाई जहाजाला नेहमीच प्रथम मार्गस्थ होण्याचा हक्क असतो, अपवाद आपत्कालीन परिस्थितीतील हवाई जहाज.

५. जर दोन हवाई जहाज एकमेकांच्या दिशेने पुढे जात असतील तर त्यांनी त्यांच्या उजव्या बाजूला वळण घेतले पाहिजे.

६. कोणत्याही परिस्थितीत ओलांडून पुढे जाण्यास परवानगी नाही.

५.१२ सर्व हवाई जहाज, पॅराशूट आणि हवेवर तरंगत जाणारे कोणतेही साधन लायक व्यक्तीने रोज तपासले पाहिजे आणि योग्य असल्याचे प्रमाणित केले पाहिजे.

५.१३ सर्व हवाई जहाज, पॅराशूट आणि हवेवर तरंगत जाणारे कोणतेही साधन यांच्यासाठी नोंद पुस्तिका ठेवणे आवश्यक आहे, ज्याच्यात वापर, तपासणी, बदल आणि दुरुस्ती याच्या नोंदी असतील.

५.१४ हवाई क्रीडेतील हवेवर तरंगत जाणाऱ्या कोणत्याही साधनाची दुरुस्ती आणि बदल उत्पादकाच्या परवानगीने करण्यात यावेत.

५.१५ हवाई क्रीडा सुविधा देणारे सर्व क्लब, असोसिएशन, सरकारी आणि इतर संस्था यांनी उपक्रमाची नियमावली पुस्तिका तयार ठेवणे आणि ती हवाई क्रीडा उपक्रमाच्या स्थानावर उपलब्ध ठेवणे आवश्यक आहे. त्याची एक प्रत संबधित सुरक्षा समितीला पाहणीसाठी पाठविण्यात यावी. या नियमावली पुस्तिकेत प्रमाणभूत कृतीची कार्यप्रणाली, साधनांच्या आवश्यक तपासण्यांची यादी, साधने आणि आपत्कालीन कार्यप्रणाली यांचा तपशील आणि वैशिष्ठ्यांची माहिती अंतर्भूत असावी.

**सुरक्षा आणि सुटका समितीची स्थापना**

६.१ साहसी खेळात धोका हा घटक असतो, त्यात ते दूरच्या, बहुतांशी रस्त्याने जाणे शक्य नसलेल्या प्रदेशात आयोजित केले जातात. अशा स्थितीत पर्यटक सहभागी होतात तेव्हा साहसी क्रीडेचे आयोजन

करणाऱ्या सर्वांनी धोका कमी करण्याच्या दृष्टीकोनातून पुरेसे सुरक्षेचे उपाय अंगिकारले आहेत याची खात्री केली पहिजे.

६.२ त्यामुळे पर्यटकाची सुरक्षा व सुटका यासाठी राज्य स्तरीय समिती गठीत करणे आवश्यक आहे. सुरक्षा उपायांची अंमलबजावणी आणि सुटकेचे योग्य प्रयत्न यावर देखरेख करू शकणारी कमिटी असावी.

६.३ सुरक्षा व सुटका समितीने राज्यातील सर्व साहसी उपक्रमाच्या मध्यवर्ती संस्थेचे कार्य केले पाहिजे.

६.४ अशीच समिती जिल्हा स्तरावर जिल्हा प्रशासनाच्या अधिपत्याखाली गठीत करण्यात यावी.

तातडीची सुरक्षा नोटीस

अशा नोटीसा, प्राप्त झालेल्या सूचना आणि अहवाल यांच्या आधाराने सदर मार्गदर्शक तत्त्वे अद्ययावत करण्यासाठी, जेव्हा गरज असेल तेव्हा, मागाहून काढण्यात येतील.

**********

## परिशिष्ट - इ

## भारत सरकार,पर्यटन मंत्रालय

## मान्यता प्राप्त साहसी पर्यटन आयोजक (ए.टी.ओ.) म्हणून मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार करणेबाबत मार्गदर्शक तत्वे

## (दि.२ जानेवारी २०१२ पासून सुधारित)

१. उद्दिष्ट व हेतू या योजनेचे उद्दिष्ट व हेतू, साहसी पर्यटन आयोजक (ए.टी.ओ) यांना मान्यता प्राप्त करून देणे आणि देशात पर्यटन वृद्धिंगत व्हावे यासाठी या प्रकारात प्रमाणभूत गुणवत्ता व सेवा देण्यासाठी प्रोत्साहित करणे आहे. हि योजना ऐच्छिक असून सर्व अधिकृत साहसी पर्यटन आयोजकांना खुली असून त्यांना नियोजनबद्ध क्षेत्रात आणण्यासाठी आहे.

२. व्याख्या - साहसी पर्यटन आयोजक (ए.टी.ओ) म्हणजे जो भारतात साहसी पर्यटनात उदा. जल क्रीडा, हवाई क्रीडा, गिर्यारोहण, पदभ्रमण/ट्रेकिंग आणि वेगवेगळ्या प्रकारच्या सफारी इत्यादी क्षेत्रात कार्यरत आहे. या व्यतिरिक्त तो प्रवास व निवास इत्यादी व्यवस्था यांच्या आयोजनातही कार्यरत असू शकेल.

३. मान्यतेसाठीचा अर्ज सहाय्यक संचालक सर्वसाधारण, पर्यटन व्यवसाय विभाग, पर्यटन मंत्रालय, भारत सरकार, खोली क्र. २३, सी-१ हटमेंट, डलहौसी मार्ग, नवी दिल्ली - ११००११, टेलिफोन क्र.०११ २३०१२८०५, फॅक्स क्र. ०११ २३०१९४७६, इमेल -sanjay.singh1@nic.in यांना सादर करण्यात यावा. नुतनीकरण/विस्तार अर्ज संबंधित क्षेत्रिय संचालकांना उद्देशून खालील पत्त्यावर पाठविण्यात यावेत.

अ) क्षेत्रिय संचालक (पूर्व), कोलकाता ब) क्षेत्रिय संचालक (पश्चिम), मुंबई. क) क्षेत्रिय संचालक (उत्तर), नवी दिल्ली, ड) क्षेत्रिय संचालक (दक्षिण), चेन्नई.

४. क्षेत्रिय संचालक (पूर्वोत्तर), गुवाहाटी मान्यता प्राप्त साहसी पर्यटन आयोजक (ए.टी.ओ) हा दर्जा पर्यटन मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्यामार्फत संबंधित क्षेत्रिय संचालक भारतीय साहसी पर्यटन आयोजक असोसिएशन सदस्य (ए.टी.ओ.आय) यांच्या समितीचे अभिप्रायाच्या अनुषंगाने पाच वर्षांसाठी प्रदान करण्यात येईल. पुढील नुतनीकरण / विस्तारासंबंधी क्षेत्रिय संचालक भारतीय साहसी पर्यटन आयोजक असोसिएशन सदस्य (ए.टी.ओ.आय) यांच्या समितीचे अभिप्रायाच्या अनुषंगाने पाच वर्षांसाठी करण्यात येईल. अर्जदाराकडून प्राप्त झालेली कागदपत्रे तपासून झाल्यावर पर्यटन मंत्रालयातील पर्यटन व्यवसाय विभागतर्फे (टी.टी.डिव्हिजन) प्रथम मान्यतेची व संबधित क्षेत्रिय संचालकातर्फे नुतनीकरण / विस्ताराची पोचपावती दिली जाईल. प्रथम मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार याची तपासणी परिपूर्ण अर्ज प्राप्त झाल्यापासून ६० कामाच्या दिवसाच्या आत तपासणी गटातर्फे करण्यात येईल.

५. साहसी पर्यटन आयोजकांनी पर्यटन मंत्रालयाकडून मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार प्राप्त करण्यासाठी खालील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

i) मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार प्राप्त करण्याबाबतचा अर्ज विहित नमुन्यात, दोन प्रतीत सोबतच्या आवश्यक कागदपत्रांसह सादर करावा.

ii) साहसी पर्यटन आयोजकाकडे किमान रु. ३ लाख रकमेचे पेड अप कॅपिटल (कॅपिटल एम्प्लाईड) असावे आणि त्याच्या पुष्ठ्यर्थ लेखापरीक्षकाने लेखा परीक्षित केलेले अलीकडील काळातील लेखा अहवाल असावे.

iii) व्यावसायिकाची फक्त साहसी पर्यटन आणि साहसी खेळाशी निगडीत खेळामधील मागील वर्षातील उलाढाल किमान रु.१० लाख असावी आणि त्याच्या पुष्ठ्यर्थ लेखा परीक्षकाने लेखा परीक्षित केलेले अलीकडील काळातील लेखा अहवाल असावे.

iv) व्यवसायाची जागा भारताच्या इतर भागात किमान १५० चौ फुट व समुद्र सपाटीपासून १००० मीटर पेक्षा जास्त उंचीवरील डोंगरी भागात १०० चौ फुट असावी. व्यवसायाची जागा स्वच्छ व नीटनेटक्या परिसरात असावी आणि तेथे टेलेफोन, फॅक्स आणि कॉम्प्युटर / कॉम्प्युटर आरक्षण प्रणाली इत्यादी असावे. तेथे स्वागत कक्षाची पुरेशी जागा व स्वच्छतागृहाची सोय असावी.

v) साहसी पर्यटन आयोजकाकडे किमान चार लायक कर्मचारी, त्यापैकी किमान एक मान्यताप्राप्त विद्यापीठाचा, IITTM किंवा AICTE मान्यताप्राप्त कोणत्याही अन्य संस्थेचा पर्यटन व पर्यटन व्यस्थापन यातील डिप्लोमा / पदवी धारक असावा किंवा दर्जेदार तज्ञ खाजगी / सरकारी संस्थेतून प्रशिक्षित असावा. व्यवसायाच्या मालकाचा समावेश लायक कर्मचाऱ्यांपैकी एक म्हणून करता येऊ शकेल. मालक / संचालक स्वतः किंवा त्यांचे व्यवसाय चालविणारे प्रमुख कर्मचारी, साहसी पर्यटन आयोजकास जो उपक्रम राबवावयाचा आहे त्यासाठी सर्व प्रकारे लायक असावेत. त्यासाठी सदर उपक्रमाच्या कोणत्याही राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय संस्थेने प्रमाणित केलेली अर्हता किंवा किमान आठ वर्षांचा प्रत्यक्ष कृतीचा व्यवहार्य अनुभव असणे आवश्यक आहे.

जर इतर दोन कर्मचारी हे हवाईमार्ग, जलमार्ग, वाहतूक, जनसंपर्क व्यवसाय, हॉटेल आणि इतर व्यवसायिक संस्था येथील अत्युत्तम अनुभवी व्यक्ती असतील आणि त्यांना पर्यटन मंत्रालय मान्यता प्राप्त पर्यटन आयोजाकांकडील दोन वर्षाचा अनुभव असेल तर सदर प्रशिक्षण अर्हता यात सुट देता येऊ शकेल.

पूर्वोत्तर राज्य, दुर्गम व ग्रामीण विभाग येथील व्यावसायिक यांच्याकडे किमान अर्हता प्राप्त दोन कर्मचारी त्यापैकी एक मान्यताप्राप्त विद्यापीठाचा, IITTM किंवा AICTE मान्यताप्राप्त कोणत्याही अन्य संस्थेचा पर्यटन व पर्यटन व्यस्थापन यातील डिप्लोमा / पदवी धारक असावा किंवा दर्जेदार तज्ञ खाजगी / सरकारी संस्थेतून प्रशिक्षित असणे आवश्यक आहे.

vi) व्यवसायिकाने त्याची उपक्रमातील विशेषता किंवा जे उपक्रम उदा. ट्रेकिंग, जल क्रीडा, हवाई क्रीडा, स्कुबा डायव्हिंग, सफारी इ. व्यवसाय म्हणून आयोजित करू इच्छितो ते स्पष्टपणे दर्शविणे आवश्यक आहे.

vii) व्यवसायिकाकडे स्वतःची साहसी उपक्रमाची साधन सामुग्री तसेच तज्ञ प्रशिक्षित कर्मचारी असणे आवश्यक आहे.

viii) प्राचीन स्मारक आणि पुरातत्वीय स्थाने आणि अवशेष कायदा, १९५८ (१९५८ चा २४) अन्वये संरक्षित स्मारके याबाबत, साहसी पर्यटन आयोजकाने भारत सरकारच्या पर्यटन विभागाचे प्रशिक्षित व परवाना धारक स्थानिक पातळीवरील पर्यटन मार्गदर्शकाची किंवा भारत सरकारने मान्यता दिलेले

इतर मार्गदर्शक किंवा माननीय न्यायालयाच्या आदेशानुसार मार्गदर्शक यांची नेमणूक / नियुक्ती करणे आवश्यक राहील. इतर स्मारके व स्थाने यासाठी संबधित स्मारक / स्थान यांचे परवानाधारक मार्गदर्शकयोग्य अधिकाऱ्याच्या आदेशानुसार जर असतील तर त्यांची मार्गदर्शक म्हणून नेमणूक / नियुक्ती करणे आवश्यक राहील.

ix) कार्यक्षेत्र कर्मचारी गट हा उपक्रमाच्या आयोजनासाठी योग्य अर्हता प्राप्त किंवा किमान पाच वर्षांचा प्रत्यक्ष कृतीचा व्यवहार्य अनुभव असणारा असणे आवश्यक आहे. कर्मचाऱ्याने विशेष संस्थांकडून उदा. आय.एम.एफ. (पदभ्रमण/ट्रेकिंग, गिर्यारोहण यासाठी) आणि एन.आय.डब्ल्यू.एस. गोवा (जल क्रीडा/हवाई क्रीडा यासाठी) साहस प्रमाणपत्र घेणे आवश्यक आहे.

x) व्यावसायिकाचे कार्यक्षेत्र कर्मचारी रेड क्रॉस किंवा समकक्ष संस्थेचा अर्हता प्राप्त प्रथमोपचारक / सी.पी.आर. किंवा भारतीय साहसी पर्यटन आयोजक असोसिएशनने आयोजित केलेला प्रमाणपत्र प्रशिक्षण पूर्ण केलेला असणे आवश्यक आहे.

xi) सदर गटाने पर्यटन मंत्रालय / भारतीय साहसी पर्यटन आयोजक असोसिएशन यांचे पर्यावरणीय पर्यटन आणि बचाव आणि सुरक्षितता या बाबतची मार्गदर्शक तत्त्वे यांच्या अनुषंगाने निसर्ग जतन प्रथा आणि पर्यावरण रक्षण पालनाचे हमीपत्र सही केले पाहिजे.

xii) प्रत्येक ग्राहकाला पर्यावरण पर्यटन मार्गदर्शक तत्त्वांची प्रत देण्याची शिफारस करण्यात येत आहे.

xiii) व्यवसायिकाला जो उपक्रम व्यवसाय म्हणून करावयाचा मानस आहे, त्या उपक्रमाशी संबधित सर्व नकाशे व संदर्भ साहित्य त्याच्या कार्यालयाच्या जागेत उपलब्ध असणे आवश्यक आहे.

xiv) व्यवसायिकाने माहिती पुस्तिका छापलेली असावी किंवा वेबसाईटवर स्पष्टपणे नमूद केले पाहिजे - १) सद्याचे उपक्रम २) उपक्रमांचे कार्यक्षेत्र ३) त्यांची पर्यावरण पर्यटन मार्गदर्शक तत्त्वे पालनाबाबतची बांधिलकी.

xv) व्यवसायिकाने त्यांचे विशेष क्षेत्र सर्व प्रचार व प्रदर्शनीय साहित्यांवर स्पष्टपणे नमूद केले पाहिजे.

xvi) PATA Green Leaf च्या सभासदत्वामुळे ATOAL ने स्वीकारलेली पर्यावरण पर्यटन तत्वे हि ऐच्छिक असतील.

xvii) साहसी पर्यटन आयोजकाने चालू निर्धारण वर्षाचे प्राप्तीकर विवरणपत्र भरलेले असावे.

xviii) साहसी पर्यटन आयोजक अर्जाच्या दिनांकापूर्वी किमान एक वर्ष आधीपासून कार्यरत असावा.

६. साहसी पर्यटनात जरी अनेक प्रकारचे उपक्रम येत असले तरी पर्यटन मंत्रालयाने सध्या प्राथमिक स्तरावर खालील चार प्रकारच्या साहसी पर्यटन आयोजकांना मान्यता देण्याचा निर्णय घेतला आहे.

i) जलक्रिडेचा व्यवहार करणारे आयोजक.

ii) हवाईक्रिडेचा व्यवहार करणारे आयोजक.

iii) विविध प्रकारच्या सफारीचा व्यवहार करणारे आयोजक.

iv) गिर्यारोहण व पदभ्रमण/ट्रेकिंगचा व्यवहार करणारे आयोजक.

७. **सुरक्षा मार्गदर्शक तत्त्वे**

i) जलक्रिडा, हवाईक्रिडा, सफारी, गिर्यारोहण व पदभ्रमण यासाठीची सुरक्षा मार्गदर्शक तत्त्वे ज्यांचे साहसी पर्यटन आयोजकाने आचरण करावयाचे आहे ती संदर्भासाठी जोडपत्रात दिली आहेत. साहसी

उपक्रमात धोका हा अंतर्भूत असतो याची नोंद घ्यायला हवी. आणि म्हणून साहसी पर्यटन आयोजकाने सुरक्षा मार्गदर्शक तत्त्वांचे काटेकोरपणे पालन केले जाते आहे याची खात्री केली पहिजे. जर साहसी पर्यटन आयोजक दुसऱ्या उप-आयोजकामार्फत उपक्रमाची व्यवस्था करीत असेल तर मुख्य साहसी पर्यटन आयोजकाची जबाबदारी असेल की दुसरा उप-आयोजक ग्राहकाला योग्य साधने देतोय आणि सर्व सुरक्षा तत्त्वांचे पालन करीत आहे याची खात्री करणे.

ii) साहसी पर्यटन आयोजकाने त्याच्या परदेशातील सहकाऱ्याने त्याच्या परदेशी पर्यटकाकडून त्यांना जर काही नुकसान, दुखापत / अपघात इत्यादी झाले तर त्यासाठी प्रवास प्रतिनिधी जबाबदार असणार नाही याचे हमीपत्र घेतले आहे आणि सदर ग्राहक वैद्यकिय विम्याच्या संरक्षणाखाली आहे आणि त्यात त्याला/तिला जर दौरा पुढे चालू ठेवावयाचा असेल तर त्याच्या स्वदेशाला परत जाण्याच्या रकमेचा समावेश आहे याची सुद्धा खात्री केली पाहिजे.

iii) विमा : साहसी पर्यटन आयोजकाकडे सर्व कृती हाताळण्यासाठी लायक कर्मचारी असावेत. साहसी उपक्रमात धोका अंतर्भूत असल्याने ग्राहक / साहसी कार्यक्रम आयोजक यांना विम्याचे संरक्षण असावे. सदर विमा विशेष तरतूद विमा संबोधला जातो. तो ग्राहक / साहसी कार्यक्रम आयोजक यांना खास विम्याचे संरक्षण देतो. उदा. त्यात अपघाती मृत्यू, हात-पाय आणि / किंवा डोळे गमावणे आणि कायमचे / अंशतः अपंगत्व यांचा समावेश होतो.

iv) नकार :मान्यता प्राप्त साहसी पर्यटन आयोजकाच्या ग्राहकाने केलेल्या कोणत्याही मागणीस पर्यटन मंत्रालय, भारत सरकार जबाबदार असणार नाही.

८. अर्ज सादर करताना, जर ग्राहकाला अपघात झाला तर त्याला आपत्कालीन मदत व स्थलांतरित करण्यासाठी करण्यात आलेली व्यवस्था याची माहिती साहसी पर्यटन आयोजकाने देणे आवश्यक आहे.

९. साहसी पर्यटन आयोजकास त्याचे मुख्य कार्यालय तसेच शाखा कार्यालय याची मान्यता आणि नुतनीकरण यासाठी अर्ज करताना ना-परतावा रक्कम रू. ३,०००/- भरावे लागतील. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, पर्यटन मंत्रालय यांना बँक ड्राफ्टच्या रुपात देण्यात यावी.

१०. साहसी पर्यटन आयोजकाने सुरक्षित व सन्माननिय पर्यटन तत्वाचे पालन करणे आवश्यक आहे. त्यासाठी खालील कार्यवाही करणे आवश्यक आहे.

i) सुरक्षित व सन्माननिय पर्यटन तत्वाच्या बांधिलकीचे हिंदी किंवा इंग्रजी भाषेतील स्वाक्षांकित शपथपत्र अर्जासोबत सादर करणे आवश्यक आहे. हिंदी व इंग्रजी शपथपत्र अनुक्रमे जोडपत्र २ व ३ नुसार जोडलेले आहे.

ii) कर्मचारी सदस्य याने साहसी पर्यटन आयोजकाकडे रुजू होण्याच्या दिवशी, त्याने / तिने शपथ घेणे / सही करणे आवश्यक आहे. सदर शपथेबाबत कर्मचाऱ्याच्या नियुक्ती पत्रात / रुजू अहवालात नमूद करता येईल.

iii) ज्या संस्थेकडे २५ पेक्षा जास्त व्यक्ती आहेत त्याच्या साहसी पर्यटन आयोजकास मान्यतेसाठी अर्ज करताना दोन मुख्य गटाचे मुद्दे (उदा. मनुष्य बळ विकास, सुरक्षा इ.) सुचविता येतील. जर साहसी पर्यटन आयोजकाकडे २५ पेक्षा कमी व्यक्ती असतील तर एक मुख्य गटाचा मुद्दा सुचविता येईल.

iv) सुरक्षित व सन्माननिय पर्यटनाच्या अनुषंगाने कपॅसिटी बिल्डिंग ऑफ सर्व्हिस प्रोव्हायडर (सीबीएसपी) योजने अंतर्गत पर्यटन मंत्रालय मान्यताप्राप्त साहसी पर्यटन आयोजकाच्या कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देऊ शकेल. साहसी पर्यटन आयोजकाचा मुख्य गट पर्यटन मंत्रालयाच्या मान्यतेच्या पहिल्या सहा महिन्यात प्रथम प्रशिक्षित करण्यात येईल.

v) साहसी पर्यटन आयोजकाने सुरक्षित व सन्माननिय पर्यटन बांधिलकीची शपथ त्याच्या मुख्य कार्यालयाच्या परिसरात / प्रवेश परिसरात ठळकपणे लावावी.

vi) नियमानुसार वर्तणुकीवर स्वाक्षरी करणाऱ्यांनी त्या मुद्यांच्या पूर्ततेसाठी त्यांनी केलेल्या कार्यवाहीची नोंद ठेवणे आवश्यक आहे.

११. साहसी पर्यटन आयोजकाच्या मुख्य कार्यालयास मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार देण्यात येईल. साहसी पर्यटन आयोजकाच्या शाखा कार्यालयाची मान्यता मुख्य कार्यालयासह किंवा नंतर देण्यात येईल. त्याकरिता शाखा कार्यालयाची मान्यतेसाठीची माहिती पर्यटन मंत्रालयाला आणि नुतनीकरण व विस्तार यासाठी संबंधित प्रादेशिक संचालक यांना माहिती सादर केली व त्यांनी ती स्वीकारलेली असावी.

१२. साहसी पर्यटन आयोजकाची मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तारासाठी, त्या विषयात तज्ञ असलेले ए.टी.ओ.ए.आय. प्रतिनिधी यांना निरीक्षण सदस्य गटात घेण्यात येईल.

१३. मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार प्राप्त साहसी पर्यटन आयोजकास भारत सरकारने वेळोवेळी प्रदान केलेल्या प्रोत्साहन आणि सवलत योजना प्राप्त करण्याचा हक्क प्राप्त होईल आणि पर्यटन मंत्रालय, भारत सरकार यांनी वेळोवेळी निश्चित केलेले मान्यता प्राप्तीचे नियम व अटी यांचे पालन करावे लागेल.

१४. साहसी पर्यटन आयोजकाने त्यांच्या वार्षिक अहवालात त्यांनी केलेल्या कार्यवाहीचा अहवाल समाविष्ट करावा आणि तो त्यांच्याकडे ठेवावा आणि समितीला नूतनीकरणाच्या वेळी दाखवावा.

१५. पर्यटन व्यवसायातील सेवा पुरविणारे यांना मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार मंजूर करण्याच्या योजनेचे स्वरूप ऐच्छिक असले तरी, जास्तीत जास्त पर्यटन व्यवसायिकांनी प्रथम मान्यता घ्यावी आणि त्यांनतर पर्यटकांना सेवा द्यावी. यासाठी पर्यटन मंत्रालय आणि पर्यटन व्यवसायिकांनी सकारात्मक भूमिका निभावण्याची आवश्यकता आहे. तसेच अमान्यताप्राप्त सेवा प्रदान करणाऱ्यांकडून सेवा घेण्यात असलेल्या संभावित धोक्याबद्दल त्याचे हितसंबंधी व ग्राहक यांनाही शिक्षित करण्याची आवश्यकता आहे.

१६. पर्यटन व्यवसायातील मान्यताप्राप्त सेवा प्रदान करणाऱ्यास पर्यटन मंत्रालयाने दिलेले मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार प्रमाणपत्र संभावित ग्राहकाला ठळकपणे दिसेल अशा रीतीने कार्यालयात फलकावर चिकटवून किंवा चित्र तसबिरीत प्रदर्शित करणे बंधकारक असेल.

१७. मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार याबाबत पर्यटन मंत्रालय, भारत सरकार यांचे निर्णय अंतिम असतील. तथापि, पर्यटन मंत्रालयास कोणत्याही संस्थेस मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार नाकारण्याचा अधिकार असेल किंवा सक्षम अधिकाऱ्याच्या मान्यतेने प्रदान करण्यात आलेली मान्यता / नुतनीकरण किंवा विस्तार कोणत्याही क्षणी काढून घेणे / रोखून धरणे याचा अधिकार असेल. असा

निर्यय घेण्यापूर्वी योग्य कारणे दाखवा नोटीस देण्यात येईल आणि प्रतिसादाच्या गुणवत्तेनुसार निर्णय घेण्यात येईल. मान्यता रद्द करण्याचा निर्णय काळजीपूर्वक विचार करून व सर्वसाधारणपणे केवळ शेवटचा पर्याय म्हणून करण्यात येईल. कारणे दाखवा नोटीस व अंतिम आदेशात मान्यता काढून घेण्याची कारणे नमूद करण्यात येतील. राज्याच्या सुरक्षेला धोका इत्यादी विशेष परिस्थितीत कारणे नमूद करणे राखून ठेवण्यात येईल.

*********